# चोरटे हल्ले

अनन्त अन्तरकर

फेब्रुवारी, १९४०

सोल एजंटस्,—

महाराष्ट्र ग्रंथभांडार,

मुंबई, ४

किंमत,—

एक रुपया.

# प्रस्तावना.

वृत्तपत्रीय लिखाण करण्याची एखाद्या लेखकाला संवय लागली कीं त्याच्या हातून चांगलेंसें ललितवाङ्मय निर्माण होणें शक्य नाहीं, अशी इतके दिवस सर्वसाधारण समजूत होती. क्षणजीवि, प्रासंगिक गोष्टींवर सदान् कदा लिहावें लागत असल्यामुळें जीवनाकडे सहृदयतेनें, तत्वशोधक दृष्टीनें पहाण्याची वृत्तपत्रव्यवसायिकाची दृष्टीच जाते; आणि त्यामुळें कथा, काव्य, नाटकासारखें त्याचें ललितवाङ्मयही उथळ होतें, असा युक्तिवाद या बाबतींत सांगण्यांत येत असे. ही सर्वसाधारण समजूत आणि हा युक्तिवाद सुप्रसिद्ध लेखक श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यानीं नुकत्याच लिहिलेल्या एका लेखांत चांगलाच खोडून काढला आहे. तात्यासाहेब केळकर, काकासाहेब खाडिलकर यांच्यासारखे आमचे खंदे ललितलेखक वृत्तपत्रसृष्टींतच वाढले आणि मोठे झाले, असा इतिहासाचा निर्वाळा देऊन वृत्तपत्रसृष्टींतलें जीवन ललित–लेखनाला मारक तर होत नाहींच; उलट पोषकच होतें, हें माडखोलकरांनीं सिद्ध केलें आहे. आणि तें अक्षरशः खरें आहे. वृत्तपत्राच्या कचेरींत काम करणाऱ्या माणसाला अनेक अद्‌भुतरम्य घटना आणि मानवी स्वभावाचे नानाविध मासले हरघडी पहाण्याचा प्रसंग येतो! आणि जातिवंत ललित लेखकाची जर त्याला दृष्टी असेल तर हे अनुभव त्याच्या ललित–वाङ्मयांत मोलाची भर घालूं शकतात. या दृष्टीनें श्री. अंतरकर यांच्या या 'चोरट्या हळयां'कडे पाहिलें, तर वृत्तपत्रव्यवसाय त्यांच्या ललितलेखनाला उपकारकच झालेला दृष्टीला पडेल. श्री. अंतरकर हे एक तरुण लेखक आहेत, आणि वृत्तपत्रव्यवसाय हें त्यांचें चरितार्थाचें साधन आहे. ते दुसऱ्या कुठल्याही व्यवसायांत असते, तर त्यांच्या या

पहिल्याच लेखसंग्रहांत जें प्रसंगवैचित्र्य आणि मानवी स्वभावाकडे उपरोधिकपणें पहाण्याची जी विशिष्ट दृष्टी आढळते ती आढळली नसती, असें मला वाटतें.

श्री. अंतरकर यांच्या उपरोधिक दृष्टिकोणाचे उत्तम नमुने म्हणून या संग्रहांतलीं किती तरी व्यंगचित्रें दाखवितां येतील. ‘ व्यवहारज्ञ, ’ ‘ सल्ला आणि फी,’ किंवा ‘त्याचें प्रेमशोधन’ हींच उदाहरणें घ्या. व्यवहारज्ञ म्हणून समजल्या जाणाऱ्या एका स्वार्थलंपटाला एका टांगेवाल्यानें कसा धडा शिकवला त्याचें मोठें मार्मिक चित्र लेखकानें अगदीं मोजक्या शब्दांत काढलें आहे. ‘ रिकामाच टांगा स्टेशनकडे नेतो आहेस, तेव्हां मला त्यांतून ने,–तुझं काय त्यांत जातं ?’ असें तो व्यवहारज्ञ त्या टांगेवाल्याला म्हणाला. तेव्हां त्या टांगेवाल्यानें उत्तर दिलें, “असं म्हनतां होय साहेब ! पन असं बघा, माझं हें घोडंबी लई थकलया. तंवा याला बांधूं या मांगल्या बाजूला, अन् तुमी घ्या त्याची जागा. तुमी बी रिकामेच चालला-यासा नव्हं का शेट ? ” ‘ सल्ला आणि फी ’ मध्यें सुंदर मुलीचें प्रेम, कीं कुरूप मुलीचा पैसा, अशा पेंचप्रसंगांत सांपडलेल्या तरुणानें आपल्या मित्राला सल्ला विचारला असतां, प्रेमाची आणि त्यागाची महती गाऊन त्या सुंदर पण गरीब मुलीशींच लग्न करण्याचा सल्ला तो मित्र देतो. पण जातां जातां त्या कुरूप मुलीचा संपूर्ण पत्ता तो विचारून जातो ! ‘ त्याचें प्रेमशोधन ’ या व्यंग-चित्रांतलें वर्णन वाचून टॉमस् हार्डीच्या भयंकर, विखारी उपरोधाची आठवण होते. रस्त्यांत सांपडलेलें गुलाबाचें फूल पाहून त्याच्या सुंदर मालकिणीच्या रूपाबद्दल कल्पनेचे मनोऱ्यावर मनोरे बांधीत तो कविराज तिच्या शोधांत पळत सुटतो. इतक्यांत गुलाबाच्या हारांनीं शृंगारलेल्या एका प्रेताची स्मशानयात्रा त्याच्या दृष्टीला पडते. आपल्या हातांतल्या फुलाकडे तो पहातो, तों त्याच्यावरहि मधूनमधून गुलालाचा शिडकाव झालेला त्याच्या दृष्टीला पडतो ! ‘ विरह ’ या गोष्टींतही उपरोध ओतप्रोत भरला आहे. श्री अंतरकरांच्या साध्या, सरळ पण सुरेख भाषाशैलीचेही कांहीं सुंदर नमुने या गोष्टींत सांपडतील. पुढील उदा-

हरणेंच पहा. "...त्या जुनाट काळाप्रमाणें या विसाव्या शतकांतही, विरहाच्या व्यथा प्रणयी जीवानां अगदीं तितक्याच दारुण उत्कटतेनें हैराण करीत होत्या. माकडापेक्षां आणि ढगापेक्षांही वेगवान् असा विद्युत्दूत या जगांत अवतीर्ण झाला होता. पण निरोपाच्या दर शब्दागणिक आगाऊ पैसे मोजून घेतल्याखेरीज फुकटंफाकट दौत्य करण्याचा त्याचा शिरस्ता नव्हता......" किंवा, "...... त्याच्या कापसासारख्या मऊ हृदयांत या उदासवाण्या विचारांची ठिणगी पडतांच तेथें विरहाग्नीनें एकदम भडका उडवून दिला !......" नखरेल शब्दांची विनाकारण खैरात करण्याचा मोह बहुतेक तरुण लेखकांना होतो. या मोहापासून श्री. अंतरकर अलिप्त आहेत. सरळ काय तें चटकन् सांगून टाकण्याच्या वृत्तपत्रीय संवयीचाच हा सुपरिणाम असावा.

जगांतल्या विविध घटनांचें आणि विचित्र पात्रांचें धावतें दर्शन वर्तमानपत्रांच्या कचेरींत काम करणाऱ्याला होत असल्यामुळें त्याचा फायदा होतो हें खरेंच; पण या धावत्या दृश्यांच्या पलीकडलें सत्य पहाण्याची त्याला दृष्टी नसेल, किंवा विचित्र दिसणाऱ्या माणसांचे मानव्य ओळखण्याइतकी त्याला सहृदयता नसेल, तर मात्र त्याचें लिखाण उथळ आणि टाकाऊ ठरण्याचा संभव आहे; कारण मग त्याच्या विनोदांत दुसऱ्याची उगाच टर उडवण्याची उनाड वृत्ती, आणि त्याच्या उपरोधांत दुसऱ्याचें बरें न पहाण्याची दुष्ट बुद्धी याखेरीज दुसरें कांहींच उरणार नाहीं. सुदैवानें श्री. अंतरकर यांच्यांत ही सहृदयता भरपूर आहे. त्यांचें ' माणूस आणि देवदूत ' हें व्यंगचित्र, किंवा ' यू चेची चूक ' ही लघुकथाच पहा. स्वर्गांत सर्व कांहीं मिळेल म्हणून देवदूत माणसाला सांगतो, ' खाणें, पिणें, कपडालत्ता, चैन सर्व कांहीं स्वर्गांत आहे. ' तेव्हां माणूस विचारतो, " मग तिथे अश्रूसुद्धां असतील, नाहीं ? " " त्यांचं नांवसुद्धां नाहीं तिथं. " देवदूत म्हणतो. " काय ? स्वर्गांत अश्रू नाहींत ? स्वर्गांत अश्रूच नाहींत ? मग तो मला मुळींच नको ! " माणूस म्हणतो, "... अश्रू कशामुळें येतात ? आंतड्याच्या मायेमुळें, अंतःकरणाच्या जिव्हाळयामुळें. स्वर्गांत अश्रू नाहींत, अर्थात् तेथें जिव्हाळा, माया,

प्रीती वगैरे मृदु भावनाही नसल्या पाहिजेत. असला स्वर्ग मला तरी पृथ्वीहून अधिक मोलाचा वाटत नाहीं.......''

'यू चे' या चिनी कापडवाल्याच्या गोष्टीनें रवीन्द्रनाथ टागोर यांच्या 'काबुलीवाला' या भावमधुर लघुकथेची मला आठवण करून दिली. उगाच मोठ्याची लहानाशीं तुलना करण्याचा माझा उद्देश नाहीं. टागोरांच्या त्या श्रेष्ठ कथेच्या तोडीची ही गोष्ट आहे, असें मी म्हणत नाहीं. टागोरांचा संयम अंतरकरांच्या गोष्टींत नाहीं. यू चेचा मुलगा फा, त्याच्याशीं झालेलें यू चेचें भाषण वगैरेंची लांबण लावल्यामुळें, अत्यंत सुंदर सुरुवात असलेली ही लघुकथा थोडीशी बिघडली आहे. पण हा दोष वगळल्यास ही कथा खरोखरच हृदयंगम आहे. श्री. अंतरकर अशा अनेक कथा लिहितील, असा मला भरंवसा वाटतो.

**अनंत काणेकर**

२३।७।४०



हें पुस्तक,

तें विकत घेऊन वाचणाऱ्या

वाचकांस—

आणि

परीक्षण लिहिण्यापूर्वी

तें वाचण्याची तसदी घेणाऱ्या

संपादकांस—

अतिशय अचंब्यानें आणि सकौतुक

आदरानें अर्पण केलें असे.

—अनंत अंतरकर

स्वतःचे दोष स्वतःच्या डोळ्यांना दिसत नाहींत म्हणतात. स्वतःचे गुणही स्वतःच्या डोळ्यांना दिसत नाहींत असें मला आतां वाटतें ! श्री. अनंत काणेकर यांनी माझ्या या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना वाचल्यानंतर, ज्यांची मला पूर्वीं दादही नव्हती असे कित्येक गुण माझ्या ठिकाणीं असल्याची मला तीव्रतेनें जाणीव झाली, आणि मोठें समाधान वाटलें. दुसऱ्याच्या दोषांची जाणीव करून देणाऱ्या आगंतुकांची जगांत उणीव नाहीं; पण गुणांची जाणीव करून देणारे विरळाच ! प्रस्तावनेच्या निमित्तानें कां होईना,— या पुस्तकाला पहिलाच वाचक श्री. काणेकर यांच्यासारखा मार्मिक आणि गुणज्ञ लाभला, हें माझें सद्‌भाग्य होय. श्री. काणेकर यांचा मी ऋणी आहें.

या पुस्तकाचें "चोरटे हल्ले" हें नांव ऐकतांच, 'त्याचा लेखक भित्रा असला पाहिजे,' अशी एकानें त्याच्यावर टीका केली. या टीकेनंतरही पुस्तकाचें तेंच नांव कायम ठेवण्यांत आलेलें पाहून, लेखक वाटतो तसा भित्रा नाहीं अशी त्याची खात्री पटेल ! उघड हल्ल्यांप्रमाणेंच 'चोरटे हल्ले' करण्यासही अंगीं धाडस तर असावें लागतेंच; शिवाय चातुर्यही असावें लागतें ! पुस्तकाला हें 'नांव ठेवण्या' चें श्रेय बऱ्याच अंशीं, माझे मित्र श्री. दत्तू बांदेकर, संपादक—चित्रा, यांस आहे, एवढें आणखी सांगितलें म्हणजे निदान मित्रऋण कबूल करण्याइतपत मनोधैर्य लेखकाच्या अंगीं आहे हें दिसून येईल.

या पुस्तकांतील तीन गोष्टी "सत्यकथा" मासिकांत पूर्वी प्रसिद्ध झालेल्या आहेत; बहुतेक सर्व व्यंगचित्रें "सवाई अनंतफंदी" या टोपणनांवानें साप्ताहिक "मौजे" त प्रसिद्ध झालेलीं आहेत; तसेंच, कित्येक विनोदी स्फुटें साप्ताहिक "मौजे"तून "रोजनिशींतील मासलेवाईक टिपणें" या सदराखालीं "सवाई अनंतफंदी" या नांवानें प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्यांच्या पुनर्मुद्रणास परवानगी दिल्याबद्दल "सत्यकथा" आणि "मौज" यांचे संपादक श्री. दत्तोपंत भागवत यांचा मी आभारी आहें. बाकीच्या कांहीं गोष्टी वगैरे "ज्योत्स्ना"—प्रभृति नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्यांच्या पुनर्मुद्रणाला परवानगी दिल्याबद्दल त्या त्या नियतकालिकांच्या चालकांचा व संपादकांचा मी आभारी आहें.

पुस्तकाच्या उत्कृष्ट बाह्य सजावटीचें सर्व श्रेय माझे चित्रकार स्नेही श्री. डी. डी. दलाल यांस आहे. त्यांनीं आपुलकीनें केलेल्या सहाय्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. प्रकाशकांचाही मी अतिशय आभारी आहें. —अ. बा. अं.

# १ : : बिनभुंवयांचा माणूस !

बाबल्यानें आपल्या सलूनला 'एव्हररेडी हेअर कटिंग सलून' असें नांव कां दिलें याचा मला आंत शिरतांक्षणींच उलगडा झाला. गिऱ्हाइकाच्या अभावीं बाबल्या आपलीच आपण दाढी ताशीत बसला होता !

एकाच वेळीं दोन गिऱ्हाइकें येण्याचा योग बाबल्याच्या दुकानांत कधींच येत नसे. आणि तसें म्हटलें तर तिसरें माणूस सामावण्याला त्यांत जागाच नव्हती. बाबल्याला याचा मोठा खेद वाटे. पण नेमक्या याच कारणामुळें त्याचीं गिऱ्हाइकें त्याच्यावर खूष होतीं ! कोणीही गिऱ्हाइक आल्यास त्याचा तिथे कधीं खोळंबा होत नसे. त्याची हजामत करायला बाबल्या 'सदैव सज्ज' असे. आणि म्हणूनच त्यानें आपल्या सलूनला 'एव्हररेडी' हें नांव देण्यांत मोठें औचित्य दाखविलें होतें, असें मला वाटलें !

गेल्या तीन वर्षांत बाबल्यानें दादरच्या टापूंत अनेक ठिकाणीं 'सलूनें' काढलीं होतीं आणि बुडविलीं होतीं. आरंभीं आरंभीं बाबल्याला गिऱ्हाइकी बरी मिळत असे. त्याच्या मनमिळाऊ, आर्जवी स्वभावामुळें, आणि विशेषतः त्याचा हात हलका असल्यामुळें आम्ही कित्येक जण त्याच्या फिरत्या दुकानाचा तपास काढूनही त्याच्याकडे जात असूं. बाबल्या आपल्या दुकानाची जागा वरचेवर कां

बदलतो, हें पहिल्यांदा आम्हाला समजेना. पण थोड्याच दिवसांनी त्याचा उलगडा झाला! बाबल्या चोरून सट्टा खेळत असे; आणि लोक त्याच्याबद्दल चोरून चर्चा करीत असत! पुढें कांही दिवसांनीं बाबल्याची सट्टेबाजी आणि लोकांची चर्चा उघडपणें चालू झाली. सलूनची कमाई सट्ट्यांत गमावल्यामुळें बाबल्याचें दुकान केव्हां कोणत्या गल्लीत जाईल याचा नेम नाहींसा झाला! मध्यंतरीं सहा महिने मात्र तो बिल्कुल सट्टा खेळला नाहीं याबद्दल लोकांत दुमत नाहीं. कारण या मुदतींत तो तुरुंगांत होता! सट्टेबाजीमुळें आणि तिच्यापायीं झालेलें देणें न फेडल्यामुळें बाबल्यावर हा प्रसंग ओढवला होता. बाबल्या तुरुंगांतून सुटून आल्यानंतर आमच्या चाळींत आलेल्या त्याच्या सलूनमध्यें मी आज प्रथमच शिरत होतों.

× × × ×

बाबल्यानें झटकन् आपली दाढी आंवरती घेतली, आणि " बसा शेट, " म्हणून अगदीं तीन वर्षांपूर्वीप्रमाणें हंसऱ्या चेहऱ्यानें खुर्ची मागें ओढली. मी खुर्चीवर बसलों. बाबल्यानें आपल्या कामाला आणि तोंडाच्या बडबडीला बरोबरच सुरुवात केली! फार दिवसांनीं एखादें जिव्हाळ्याचें माणूस भेटावें तशा आपुलकीनें तो बोलत होता.

माझ्यासमोर एक मराठी वर्तमानपत्र पडलें होतें. त्यांतल्या कापूस-भावाच्या आंकड्यांकडे मी सहज दृष्टिक्षेप करायला, आणि बाबल्याचें लक्ष तिकडे जायला एकच गांठ पडली.

" काय शेट, आज काय येल आंकडा? " बाबल्यानें मला अगदीं सहजगत्या विचारलें.

पण तो प्रश्न माझ्या आटोक्याबाहेरचा होता. मी बाबल्याला तसें पुन्हा-पुन्हा सांगितलें. पण त्याचा माझ्यावर विश्वास बसलेला दिसला नाहीं.

" काय साहेब वार्ता करता तुम्ही,......." माझ्याकडे संशयित मुद्रेनें पहात तो म्हणाला, " पद्मनाभशास्त्री अजून तुमच्याच मजल्यावर रहातो ना? "

" हो! पण त्याचा इथे काय संबंध? " मी चकित होऊन विचारलें.

" त्याच्या पायीं तर आज माझी अशी दुर्दशा झाली आहे ना ? पोटाची खळगी भरीन कशी तरी; पण आज प्रत्येकजण माझ्याकडे तिरस्कारानें पहातो. माणुसकीला मी महाग झालों आहें. त्याची माझ्या जिवाला मोठी खंत वाटते. " बाबल्याच्या अंतःकरणाला होत असलेल्या वेदना त्याच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित झाल्या होत्या. त्याची भाषा मला जशीच्या तशी आठवत नाहीं. पण पांढरपेशा लोकाजवळ तो आपल्या मतें जरा भारदस्त भाषेंत बोलत असे. त्या भाषेंत त्यानें जी हकीकत सांगितली ती मला अगदीं नवी नसली, तरी आजिबात जुनाही नव्हती.

× × × ×

आमच्या मजल्यावर आमच्या समोरच्याच खोलींत रहाणारा पद्मनाभशास्त्री हा बाबल्याचा ज्योतिषीय सल्लागार होता. पंडित पद्मनाभशास्त्री पाखंडे याच्या दरवाजावर,—

हस्तरेषासामुद्रीक
अचुक भविष्य वर्तवीणार
आणि धारणा सांगणार

अशी पाटी लटकत असलेली मी पाहिली होती. रात्रीं बेरात्रीं तो कोणाची तरी वाट पहात असल्यासारखा अस्वस्थ मनानें गॅलरींत येरझारा घालीत असतांना मी अनेक वेळां पाहिलें होतें.

तो कोणाची वाट पहात असे हें मला मोठें कोडें पडलें होतें. पण थोडे दिवस पाळत ठेवल्यावर हें कोडें उलगडलें. रस्त्यांतून "एऽऽ धूऽऽम धडाकाऽऽ" अशी आरोळी आली कीं, पद्मनाभशास्त्री आपल्या तंद्रींतून खडबडून जागा होत असे. येरझारा थांबवून तो हळूच चोरट्या नजरेनें आजूबाजूला पहात असे, आणि तोंडाच्या दोन्ही बाजूला हातांचा आडोसा करून, दाबलेल्या आवाजांत "शूःऽ शूःऽऽ" करून, " धूऽऽमधडाके " वाल्याला वर बोलावीत असे. आणि त्याच्या हातांतला 'धूमधडाक्या'चा अंक जवळ—जवळ हिसकून घेऊन, त्याला ताबडतोब खालीं पिटाळीत असे.

"धूमधडाक्यां"तून मिळवलेल्या महत्त्वाच्या खबरीचा उपयोग तो स्वतःपुरताच करीत असावा, अशी माझी आतांपर्यंत समजूत होती.

पण आतां मात्र माझ्या लक्षांत आलें. पंडितजी या धंद्यांत कमाई करतात; ते कांहीं गमावीत नाहींत. पंडितजींचा योगक्षेम कसा चालतो याचेंहि मला मोठें गूढ पडलें होतें. कारण एका वर्षापूर्वी, त्यांच्याकडे गिऱ्हाईक बाबल्याइतकेंच असे! पण हेंहि गूढ आतां उकललें. पंडितजींना दुसऱ्यांचें भविष्य कितपत सांगतां येत होतें कोण जाणे! पण स्वतःचा भाग्योदय कशांत आहे, हें त्यांनीं अचूक ओळखलें होतें. लोक त्यांना हात दाखवायला आले नाहींत, तरी आपलें त्यांना हात दाखवल्यावांचून चालायचें नाहीं, ही त्यांनीं पक्की खूणगांठ बांधली होती! "धूमधडाक्यां"तली माहिती आत्मसात् करायची, मजल्यावरच्या रहिवाश्यांनीं काढलेल्या वाचनालयांत यणारीं वर्तमानपत्रें,—वर्गणी न भरतांच,—वाचण्याच्या मिषानें त्यांतील आंकड्याचा अभ्यास करायचा, आणि या सगळ्यांचा मेळ घालून, बाबल्यासारख्या भोळ्या आणि अडाणी गिऱ्हाइकांना 'अचूक आंकडे' सांगून त्यांच्याकडून पैसे उकळायचे, हा पंडितजींचा रोजगार होता. दहाबारा वर्षांचीं जुनीं पंचांगें त्यांनीं पैदा करून ठेविलीं होतीं, वर्तमानपत्रांतील भविष्य ते नेमानें वाचीत, त्यामुळें बारा राशी आणि नऊ ग्रहांचीं नांवें त्यांना पाठ झालीं होतीं. हस्तरेषासामुद्रिकशास्त्र त्यांना अवगत नव्हतें; तरी तें आपण जाणत असल्याचा आव कसा आणावा, ही कला त्यांनीं चांगली साध्य करून घेतली होती. एवढ्या सामुग्रीवर त्यांनीं बाबल्यासारखीं कित्येक गिऱ्हाइकें भविष्याच्या जाळ्यांत अडकविलीं होतीं.

तीन वर्षांपूर्वी बाबल्यानें आमच्या चाळींत स्वतःचें दुकान काढलें. रात्रंदिवस मेहनत घेऊन, सर्व प्रकारें गिऱ्हाइकांची मर्जी संभाळून त्यानें तें भरभराटीस आणलें. त्याचा मनमिळाऊ, आर्जवी स्वभाव, दुकानांतील स्वच्छता आणि टापटीप, यामुळें सगळीं गिऱ्हाइकें बाबल्यावर खूष असत. खर्चवेंच वजा जातां बराच पैसा बाबल्याच्या गांठीला शिल्लक राहूं लागला. पण पद्मनाभशास्त्र्याची आणि बाबल्याची गांठ पडली, आणि बाबल्याची पैशाची गांठ ढिली झाली. पद्मनाभशास्त्र्यानें बाबल्याला पहिल्यांदा सट्टा खेळून पैसे कमविण्याचा सल्ला

मोफत दिला. आणि नंतर तो त्याला 'अचुक धारणा' आणि हुकमी लॉटरीचे नंबर 'माफक फी' घेऊन सांगूं लागला. बाबल्याचे बरेचसे पैसे सट्ट्यांत जाऊं लागले, आणि राहिलेले पद्मनाभशास्त्र्याच्या खिशांत जाऊं लागले! दुकानावरून त्याचें लक्ष इलूहलू अजिबात उडालें. धंदा बसला. मारवाड्याकडून कर्ज काढायला सुरवात झाली. सलूनचें जुगाराच्या अड्ड्यांत रूपांतर झालें. बाबल्याची सट्ट्यांत पैसा मिळविण्याची हांव, आणि पद्मनाभशास्त्र्याची फी, बरोबरच वाढत चालली. आणि नंतर कांहीं दिवसांनी बाबल्याचें दुकान बंद झालें. आणखी पांच सात ठिकाणीं बाबल्यानें सलूनें, किंवा जुगाराचे अड्डे काढले. सलूनची पाटी केवळ जुगाराचा अड्डा दृष्टीआड करण्यापुरती असे. रविवारच्या गर्दीच्या दिवशीं तेवढें काम करायचें; इतर दिवशीं गिऱ्हाइकाच्या अभावीं दिवसाची रात्र करायची, आणि रात्रीचा दिवस करून सट्टेबाजी करायची, असा बाबल्याचा क्रम सुरू झाला. कांहीं दिवसांनीं बाबल्यावर जुगाराच्या कायद्याखालीं खटला भरण्यांत आला, आणि बाबल्याची सहा महिने तुरुंगांत रवानगी झाली! बाबल्याचा ज्योतिःशास्त्र किंवा सट्टाशास्त्र–पारंगत सल्लागार पद्मनाभशास्त्री मात्र प्रतिष्ठितपणें जगांत वावरत होता! त्याच्या चैनींत बिलकुल खंड पडला नाहीं. कारण बाबल्या एक तुरुंगांत गेला तरी दुसरे अडाणी लोक काय मुंबईत थोडे होते!

× × × ×

बाबल्यानें अगदीं मोकळेपणानें मला सर्व हकीकत सांगितली. मधून मधून तो स्वतःला शिव्या देत होता. पद्मनाभशास्त्र्यावरही त्याचा मोठा दांत दिसला. त्याची हकीकत ऐकून मलाही वाईट वाटलें. तुरुंगांतून सुटल्यापासून तो कधीं सट्टा खेळला नाहीं. परंतु एकदां दुकानाची घडी विस्कटली ती विस्कटली. पुष्कळशा गिऱ्हाइकांना त्याच्या दुकानांत येणें कमीपणाचें वाटूं लागलें होतें. ज्यांनी त्याच्याकडून 'उधार' हजामत करून घेऊन त्याचे पैसे बुडविलेले होत, अशींही गिऱ्हाइकें त्याच्या दुकानावरून त्याच्याकडे हेटाळणीनें हंसत पहात निघून जात. कारण बाबल्याला आतां पत राहिली नव्हती! नवीन जुळवाजुळव करून, तुटपुंज्या सामुग्रीनिशीं थाटलेल्या सलूनमध्यें एकदां येऊन गेलेले

गिऱ्हाईक पुन्हा ~~सहसा~~ कधीं येत नसे. आणि भरपूर गिऱ्हाईक मिळाल्याशिवाय सलूनमध्यें सुधारणा करणें शक्य नव्हतें !

आपल्या लांबलचक हकिकतीचा समारोप करीत बाबल्या म्हणाला, "मला आज कुणाला तोंड दाखवायची साय नाहींशी झाली आहे; पण पद्मनाभशास्त्री मात्र प्रतिष्ठितपणें चारचौघांत मिरवतो आहे. सट्टेबाजीपायीं माझें सर्वस्व गमावलें. मी कायद्यानें गुन्हेगार ठरलों. तुरुंगांत जाऊन आलेला बदफैली माणूस म्हणून जुनीं गिऱ्हाइकें माझ्या दुकानाची पायरी चढत नाहींत. माझ्या काळजाला विंचू डसल्यागत वेदना होतात बघा. पण मला सट्टेबाजीचा नाद लावून आपलें पोट जाळणारा पद्मनाभशास्त्री मात्र संभावितपणें चैन करतो आहे. आहे कीं नाहीं दुनियेचा न्याय ?" एक निःश्वास सोडून बाबल्या, बहुधा स्वतःच्या दुर्दैवाला, हंसला. थडग्यावर पसरलेल्या पांढऱ्या शुभ्र फुलांसारखें त्याच्या चेहऱ्यावरचें तें हंसें मला भयाण वाटलें.

"तुला माहीत असेल बाबल्या ! पद्मनाभशास्त्र्याचें उखळ हल्लीं पांढरें झालें आहे. त्यानें त्या बयरामजी पार्श्याला रेसचा घोडा सांगितला, तो कसा कोण जाणे, बरोबर आला ! आणि तेव्हांपासून त्याची चलती सुरू झाली आहे...कांहीं म्हण तूं बाबल्या, पण या पद्मनाभशास्त्र्याला चांगला हात दाखविला पाहिजे. लेकाच्याला असा धडा दिला पाहिजे कीं, पुन्हां कुणाला तोंड दाखवायची सोय राहतां कामा नये. मात्र कायद्याचा इथे कांहीं उपयोग नाहीं. कायदा पद्मनाभशास्त्र्याच्या केंसालासुद्धां धक्का लावूं शकत नाहीं !"

"खरं आहे शेट," बाबल्या विलक्षण रीतीनें हंसून म्हणाला, "पण मला तर लावतां येतो ना ?"

बाबल्याची नजर या वेळीं समोरच्या संगमरवरी टेबलावर पडलेल्या वर्तमानपत्रांतील एका विशिष्ट जाहिरातीवर खिळलली मला आरशांत दिसली. त्याचे डोळे कांहीं विलक्षण रीतीनें चमकत होते. त्याच्या डोक्यांत कांहीं तरी गूढ विचार

चालू होते, आणि कुठे तरी पहायचं म्हणून तो त्या वर्तमानपत्राकडे पहात होता, अशीच माझी खात्री झाली.

× × ×

थोडे दिवस गेले. एके दिवशीं संध्याकाळीं पद्मनाभशास्त्री आपल्या दरवाज्यांत उभा असलेला मला दिसला. मी त्याच्याकडे न्याहाळून पहात असल्याचें त्याच्या लक्षांत येतांच तो झटकन् आंत पळाला. हो पळालाच! त्याचा चेहरा अगदीं विद्रूप दिसत होता. पहिल्यांदा माझ्या नीट लक्षांतच आलें नाहीं. पण नंतर जरा न्याहाळून पाहिलें, तेव्हां माझ्या लक्षांत आलें कीं, पद्मनाभशास्त्र्याच्या भुंवयांच्या जागीं एकही केंस शिल्लक राहिला नव्हता! जणुं त्याला भुंवया जन्मतःच नव्हत्या. आणि त्याच्या डोक्यावरील केंसांत ठिकठिकाणीं चट्टे पडलेले दिसत होते! मी आश्चर्यचकित झालों!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर, दाढी वाढली नव्हती, तरी ती करण्याचें निमित्त करून मी बाबल्याच्या दुकानांत गेलों.

गेल्याबरोबर अगदीं उतावळेपणानेंच मी बाबल्याला विचारलें, "अरे बाबल्या, पद्मनाभशास्त्र्याला पाहिलंस तूं अलीकडे कधीं?"

बाबल्या खदखदून हंसूं लागला. हंसें आंवरण्याचा निष्फळ प्रयत्न करीत तो म्हणाला, "कां? मागच्या उपकारांत फुकट हजामत करून घ्यायला पद्मनाभशास्त्री मधून—मधून येतो अजून इथे! परवांच येऊन गेला इथून!"

"त्याच्या भुंवया बघितल्यास तूं? साफ भादरल्यासारख्या झाल्या आहेत, आणि डोक्यांत कसले चट्टे पडले आहेत! विद्रूप ध्यान बनलें आहे तें आतां!"

"मग मी सांगितलें नव्हतें तेव्हांच. पद्मनाभशास्त्र्याच्या केंसाला मला धक्का लावतां येतो, असं मी उगाच नाहीं म्हटलं!" बाबल्या पुन्हां मोठमोठ्यानें हंसूं लागला!

टेबलाचा खण उघडून काळजीपूर्वक आंत ठेवलेलें एक कात्रण, ( कटिंग ) आणि एक छोटीशी ट्यूब त्यानें बाहेर काढली. आणि त्या दोन्ही वस्तू माझ्या पुढ्यांत ठेवून तो सूचक मुद्रेनें माझ्याकडे पहात राहिला.

तें कात्रण मी वाचून पाहिलें. केशनाशक क्रीमची ती एक जाहिरात होती. एकदां त्या क्रीमचा उपयोग करून केंस काढले कीं उभ्या जन्मांत ते पुन्हां डोकें वर करणार नाहींत अशी त्या जाहिरातींत हमी दिलेली होती ! आणि ती ट्यूब केशनाशक क्रीमचीच होती ! !

" तुम्हीच म्हणालां ना, त्याला कुणाला तोंड दाखवायची सोय रहातां कामा नये म्हणून ! " बाबल्या माझ्याकडे पाहून पुन्हां खदखदां हंसूं लागला.

× × × ×

दुसऱ्या दिवशीं पहातों तों बाबल्याच्या दुकानाला टाळें ! कुठल्या गल्लींत गेला होता कोण जाणे !

---

## २ : : एखाद्याचें नशीब !

तो आणि गदाधर—भल्या पहांटे उठून फिरायला जाण्याचा त्या दोघांचा नित्यक्रम गेले बरेच दिवस अखंड चालू होता. त्याची 'ती' महिन्यापूर्वी माहेरीं गेली असल्यामुळें अलीकडे रोज त्याला अगदीं गाढ झोंप मिळत असे. त्यामुळें पहांटे उठणें फारसें जड जात नसे.

त्याची ती माहेरीं गेली असल्याची संधि साधून गदाधरानेंही त्याच्याकडे चांगलेंच बस्तान बांधलें होतें. फिरून आल्यावर त्याच्याकडेच गदाधराचा रोजचा चहा होत असे. अर्थात् गदाधरानें त्याच्याबरोबर पहांटे फिरायला जाण्याच्या कामीं हेळसांड अशी कधीं केलीच नाहीं !

मात्र गदाधरापुढें चहाचा कप करतांना तिची ती डोळे वटारलेली आणि भांड्यांची आदळआपट करीत असलेली मूर्ति त्याच्या नजरेसमोर नेहमीं उभी रहात असे.

असेच एके दिवशीं ते प्रभातफेरी करून परत येत होते. तो ज्या चाळींत रहात होता तिच्या जवळ आल्यावर त्याची नजर अगदीं सहजच त्याच्या पहिल्या मजल्यावरील खोलीकडे वळली.

## चोरटे हल्ले

—एकाएकीं तो दचकला! त्याच्या खोलीचा दरवाजा सताड उघडा असलेला त्याला दिसला.

त्याचा मित्र गदाधर त्याला कांहीं विचारणार तोंच,—" लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं. " असें कांहीं तरी तो पुटपुटला, आणि भयभीत मुद्रेनें तडक आपल्या खोलीकडे पळत सुटला!

गदाधराला वाटलें, फुकटांत लागलेला चहाचा रतीब आज बहुतेक चुकणार! तोहीं त्याच्या मागोमाग पळत सुटला!

त्याच्या खोलीचा दरवाजा उघडा होता खराच! खोलींतलें सगळें सामान अस्ताव्यस्त पडलें होतें.

" खोलींत चोरी झालेली दिसते. " गदाधर शक्य तितकें खेदाचें अवसान आणून म्हणाला.

पण त्याचें तिकडे लक्षच नव्हतें. तो आनंदानें पटापट उड्या मारीत होता.

त्याचा हा अवतार पाहून गदाधर थक्कच झाला. " अरे, खोलींत चोरी झालेली दिसते. पहा तरी चोरांनीं काय लांबविलें तें! "

"ऊंः, त्याचें काय मोठेसें!" तो एक समाधानाचा सुस्कारा टाकून म्हणाला, " थोडक्यावरच निभावलें! दरवाजा उघडा दिसला तेव्हां माझ्या छातींत धडकीच भरली होती. मला वाटलें, खचित 'ती' माहेराहून परत आली. पण नाहीं. देवानें खैर केली! "

" अरे पण चोरी झाली त्याचें काय? " गदाधर त्याला शुद्धीवर आणण्याच्या इराद्यानें म्हणाला.

" जाऊं दे रे. चोरांनीं डल्ला मारला तरी नेऊन नेऊन ते असें कितीसें नेणार? पळविण्यासारखें जें कांहीं होतें तें सगळें 'ती' आधींच आपल्या माहेरीं घेऊन गेली आहे! येऊन जाऊन गेल्या पगारांतील शिल्लक टेबलाच्या खणांत होती, ती चोरांनीं लांबवली असेल! पण 'ती' परत आली असती तर इथून पुढें प्रत्येक महिन्याच्या शिल्लकेची वाट लागली असती! "

---

## ३ : : विघ्नहर्त्यावर मात !

### नोटिस बोर्ड

*गबदुल कादर चाळ, सार्वजनिक गणेशोत्सव, १९३ **

**जाहीर विनंती**

चालू सालच्या सा० गणेशोत्सवांत कोणत्या प्रकारच्या सुधारणा करणे आवश्यक आहे यासंबंधीं चाळींतील रहिवाशांनी सूचना पाठविल्यास त्यांचा अवश्य विचार केला जाईल. तरी ज्या कोणास अशा सूचना पाठवणेच्या असतील त्यांनीं त्या ता० × × च्या आंत सेक्रेटरींकडे रवाना करणेची विनंती आहे.

सर्वांचा नम्र,

× × भांबरभुंडे,

सेक्रेटरी,

गबदुल कादर चाळ सा० ग०

[ सदरहू ' जाहीर विनंती ' नोटिस बोर्डावर झळकल्यानंतर गबदुल कादर चाळीतील कित्येक रहिवाशी आणि सेक्रेटरी श्री. भांबरभुंडे यांच्या दरम्यान पत्ररूपानें जो विचारविनिमय, अथवा बाचाबाची झाली ती पुढें जशीच्या तशी दिली आहे. गणेशोत्सवांत लुडबुड करून येनकेन प्रकारेण आपलें नांव सर्वतोमुखी करूं इच्छिणाऱ्या कार्यकर्त्या आणि विघ्नकर्त्या व्यक्तींस हा पत्रव्यवहार मार्गदर्शक होईल अशी आशा आहे.

म्हणतात ना,–' नांवांत काय आहे ? ' गणपतीचें नांव ' विघ्नहर्ता ' असेल; पण म्हणून खुद्द त्याच्याच उत्सवाचें निमित्त करून नसते तंटेबखेडे माजवून, माणसें त्याच्यावर जी मात करतात ती तो चुकवूं शकेल काय ? ]

## मूर्तीविषयीं

### श्री. पाखंडे यांचें पत्र

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ, सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

चालू वर्षाच्या गणेशोत्सवांत गणपतीच्या मूर्तीला अजिबात स्थान देण्यांत येऊं नये अशी माझी सूचना आहे. मूर्तीसाठीं दहाबारा रुपये खर्च करणें म्हणजे निव्वळ मातींत पैसे घालवण्यासारखें आहे ! गेल्या वर्षी गणपतिउत्सवाच्या दाही दिवसांत आपला गणपती तांबडा होता कीं पिवळा होता हें मी पाहिलेंसुद्धां नाहीं. आणि त्यापासून माझा फायदाच झाला! गणपतीसमोर गेल्यावर आजूबाजूला चार लोक असले, तर मनाच्या नाहीं पण जनाच्या लज्जेखातर तरी एखादा पैसा त्याच्या पुढ्यांत फेंकावाच लागतो. पण या प्रसंगांतून मी सहीसलामत सुटलों. दिडकीला मुकण्याचें विघ्न माझ्यावर कोसळलें नाहीं याचें कारण विघ्नहर्त्याचें दर्शन मी अजिबात घेतलें नाहीं हेंच होय !

एक गणपतीची मूर्ति म्हटली म्हणजे तिच्यापायीं सतराशें विघ्नें उपस्थित होतात. रोज तिची पूजा करा रे, नैवेद्य दाखवा रे, देवे म्हणा रे, एक का

दोन,—नाना भानगडी असतात ! शिवाय मूर्तींच्या रक्षणासाठीं आणखी रात्रपाळ्या कराव्या लागतात ! आतां गणपतीचें रक्षण आम्हीं करायचें, कीं गणपतीनें आमचें रक्षण करायचें. आणि हा म्हणे विघ्नहर्ता ! सबंध गणेशोत्सवांत गणपतीची मूर्ति ज्यांनीं पाहिलीसुद्धां नाहीं असे माझ्यासारखे आणखी कैक लोक चाळींत असतील. मग हें गणपतीचें विघ्न हवें कशाला ? मूर्तीसाठीं पैसे खर्च करण्यापेक्षां त्या पैशांत एखादा झकाससा कार्यक्रम ठेवावा. म्हणजे लोक चूप बसतील !

आपला,

× × पाखंडे

S S S

## सेक्रेटरीचें उत्तर

रा. रा. पाखंडे यांस,

सा. न. वि. वि.—

आपली सूचना एकतर्फी व एककल्लीपणाची असल्यामुळे ती मान्य करतां येत नाहीं याचा खेद वाटतो. आपल्या पत्रावरून मी दोन अनुमानें काढलीं. एक आपण गणपतिउत्सवांत प्रत्यक्ष कार्य कधीं केलेलें नाहीं; व दुसरें आपण अजून संसारांत पडलेले नाहीं.

गणपतीच नसेल तर उत्सव कशाचा करायचा ? शिवाय गणपति ही तुम्ही म्हणतां तशी खर्चाची बाब नाहीं. तुम्ही स्वतःवरून जग ओळखतां म्हणून तुम्हांला तसें वाटतें. पण दुसरे पुष्कळ लोक असे आहेत, कीं जे एक पैशापासून पांच रुपयांपर्यंतसुद्धां रक्कम गणपतीपुढें ठेवीत असतात. शिवाय तांदूळ आणि सुपाऱ्या गणपतीपुढें ठेवल्या जातात. त्या विकून पैसे येतात. तेव्हां, कांहीं नाहीं तरी गणपति म्हणजे २५–३० रुपये निवळ उत्पन्नाची बाब आहे. यास्तव तुमची सूचना व्यवहाराला धरून नाहीं.

गणपतीजवळील रात्रपाळीचा जो प्रश्न तुम्हीं उपस्थित केला आहे, त्याही बाबतींत वस्तुस्थिति तुम्हाला माहीत नाहीं. चाळीतले संसारी पुरुष स्वखुषीनें

आणि अहमहमिकेनें मंडपांत रात्रीचा पहारा करण्यास येत असतात. या बाबतींत अधिक न लिहिणेंच इष्ट.

आपला,
× × भांबरमुंडे
सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ सा. ग.

ऽ ऽ ऽ

### श्री. पाखंडे यांचें प्रत्युत्तर

सेक्रेटरी, ग० का० चाळ, सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

गणपतीऐवजी सुपारी ठेवावी. म्हणजे खर्चांत बचत होऊन उत्पन्न कायम राहील.

आपला,
× × पाखंडे

ऽ ऽ ऽ

---

## कॉफीविषयीं

---

### श्री. लाळघोटे यांचें पत्र

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ, सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

चाल् सालच्या गणेशोत्सवांत कॉफीचा कार्यक्रम अजिबात होणार नसल्याची कुणकुण ऐकतों. असें कां ? आम्ही कॉफी कधी प्यायलों नाहीं असें नाहीं. गणपति उत्सवाला दिलेल्या वर्गणीच्या पैशांत आम्हांला पोट फुटेतों कॉफी पितां आली असती. पण प्रश्न तत्वाचा आहे. आज कैक वर्षें आम्ही गणपति उत्सवांत कॉफी पीत आलों आहोंत. एक वर्ष मी कार्यकारी मंडळांत होतों, त्या वर्षी तर

इतकी कॉफी झाली होती कीं, उरलेली कॉफी कार्यकारी मंडळाच्या प्रत्येक सभासदाच्या घरीं पातेलें-पातेलेंभर गेली होती. चालू सालचे कार्यकारी मंडळ यापासून कांहीं बोध घेईल काय ?

आपला,
× × लाळघोटे

s s s

## सेक्रेटरीचें उत्तर

रा. रा. लाळघोटे यांस,

सा. न. वि. वि.—

कार्यकारी मंडळाच्या सभासदांना आपल्या फायद्याची बाब कोणती हें समजत नाहीं असें का तुम्हाला वाटतें ? पण करणार काय ? गेल्या वर्षी कॉफीच्या कार्यक्रमामुळें ज्या कित्येक विलक्षण घटना घडून आल्या, त्या लक्षांत घेतां यंदा तो कार्यक्रम करणें धोक्याचें वाटतें. चालू सालचें कार्यकारी मंडळच दुर्दैवी म्हटलें पाहिजे, दुसरें काय ?

गेल्या वर्षी चाळींतील एक रहिवाशी इतकी बेसुमार कॉफी प्याला कीं, दुसऱ्या दिवशीं तो हार्ट फेल होऊन मेला. ( मागाहून असें दिसून आलें कीं गणपतीची वर्गणी त्यानें अजिबात दिली नव्हती ! ) असल्या भयंकर प्रकाराची गणपति उत्सवांत तरी पुनरावृत्ति होणें इष्ट नाहीं. गतवर्षीची दुसरी शोचनीय घटना म्हणजे कार्यकारी मंडळाचा एक सभासद एक पातेलेंभर कॉफी मागल्या दारानें आपल्या घरीं रवाना करीत असतां पकडला गेला. त्याच्यावर पाळत ठेऊन बसलेले कांहीं वर्गणीदार मोठ्यानें खांकरले. परिणाम असा झाला कीं, कॉफीचें पातेलें घेऊन जात असलेला त्याचा मुलगा दचकला आणि हातांतलें पातेलें निसटून पडल्यामुळें बिचारा सडकून भाजला.

गतवर्षीच्या कार्यकारी मंडळाच्या दुसऱ्या एका सभासदानें कॉफीसाठीं आणलेल्या दुधावरील सायीचा फडशा पाडला. तें एक असो म्हणा. त्यानें कांहीं मुलखावेगळें केलें अशांतला भाग नाहीं. पण त्याच्या गाफीलपणाला कांहीं सीमा?

त्याच्या झुबकेदार मिशांत इतकी साय अडकून राहिली होती, की कार्यकारी मंडळाच्या सभासदांच्या चोरट्या व्यवहाराबद्दल उभ्या गांवांत कुजबुज सुरू झाली. पण या बेट्याच्या तें गांवींसुद्धां नव्हतें. साय खाल्ली तर मिशा साफसूफ करायची तरी काळजी घ्यायची ! असो. तेव्हां गेल्या वर्षी घडलेले हे सर्व प्रकार विचारांत घेतां, यंदा कॉफीचा कार्यक्रम रद्द करणेंच श्रेयस्कर वाटतें.

आपला,
× × भांबरभुंडे
सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ सा. ग.

ऽ ऽ ऽ

## श्री. लाळघोटे यांचें प्रत्युत्तर

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ, सा. ग. यांस,
सा. न. वि. वि.—

ज्यानें त्यानें आपला वकूब पाहून कॉफी प्यावी. या कामीं एखाद्या डॉक्टराचें सहकार्य मिळवावें. प्रत्येकाचें प्रकृतिमान डॉक्टरांनीं तपासून पहावें, व ते शिफारस करतील तितकीच कॉफी प्रत्येकाला देण्यांत यावी. कार्यक्रम आटोपेपर्यंत डॉक्टरांनीं जवळपास हजर असावें. शिवाय असें पहा, गेल्या वर्षी बायकामुलेंसुद्धां सुमारें हजार माणसें कॉफी प्यायलीं. पैकीं अवघा एकच हार्ट फेल होऊन मेला. म्हणजे कॉफी पिऊन जगणारे बहुसंख्य आहत.

कार्यकारी मंडळाच्या सभासदांना कॉफी घरीं पाठवायची झाली तर त्यांनीं मुलाचें वयोमान लक्षांत घ्यावें. १८ वर्षांच्या आंतील मुलास कॉफीच्या पातेल्याला हात लावण्याची सक्त मनाई करावी. वयांत आलेला मुलगा निवडावयाचा तो सुद्धां चांगला बेरड असावा. कोणी खांकरला म्हणून दचकणारा असूं नये. कॉफीच्या हॉलचा एकच दरवाजा उघडा ठवून बाकी सर्व बंद करतां आले तर फार चांगलें !

आतां शेवटचा मुद्दा. कार्यकारी मंडळाच्या सभासदांनीं साय खाल्ल्यानंतर मिशा साफसूफ करण्यापेक्षां आधीच त्या अजिबात साफ करून टाकल्या तर

कसें होईल ? माझी आपली एक सूचना आहे. सगळ्याच सभासदांनीं आधीं मिशा उतरून टाकलेल्या असल्या, म्हणजे मागाहून एकाच्या गाफीलपणामुळें इतरांची अब्रू धोक्यांत यायला नको !

इतके उपाय अंमलांत आणल्यावर कॉफीचा कार्यक्रम करणें मुळींच धोक्याचें नाहीं.

आपला,

× × लाळघोटे

ऽ ऽ ऽ

## सेक्रेटरीचें प्रत्युत्तर

श्री. लाळघोटे यांस,

सा. न. वि. वि.—

कार्यकारी मंडळांतील झाडून सगळे सभासद सनातनी मताचे असून, त्यांच्यापैकीं बहुतेकांचे आईबाप हयात आहेत. मिशा काढून टाकण्याचे कामीं ही मोठीच अडचण आहे. कॉफीपानाचा लोकप्रिय कार्यक्रम घडून यावा या उदात्त हेतूनें एक वेळ ते सभासद मिशा काढून टाकण्यास कबूल झाले, तरी त्यांचे आईबाप गृहत्याग करून तीर्थयात्रेला जाण्याची मोठीच भीती आहे. तेव्हां अशा परिस्थितींत कॉफीचा कार्यक्रम करणें अशक्य आहे.

आपला,

भांबरभुंडे,

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ सा० ग०

× × ×

## लाळघोटे यांचें प्रत्युत्तरास प्रत्युत्तर

सेक्रेटरी, ग० का० चाळ, सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

आपली भीती व्यर्थ आहे. आपण जिला भीती म्हणतां ती कार्यकारी

मंडळाच्या सभासदांस इष्टापत्तीच वाटेल. केवळ मिशा काढल्यानें त्यांचे आई-बाप कायमचे तीर्थयात्रेस जाणार असतील, तर ते तत्काळ मिशा काढण्यास तयार होतील. वाटल्यास आपण चौकशी करून पहा.

आपला,

× × लाळघोटे

× × ×

## देव्यांविषयीं

### श्री. कानफाटे यांचें पत्र

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ, सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

यंदांच्या गणेशोत्सवांत देव्यांचा कार्यक्रम अजिबात होऊं नये. आपल्या चाळीच्या भिंती फारशा मजबूत नाहींत, हें आपल्याला माहीत आहे, असें मी धरून चालतों. कारण या बाबतींत मालकाकडे गेलेल्या अर्जावर आपली सही आहे. इकडे देवे चाललेले असतांना तिकडे चाळींत पुष्कळ माणसें बसलेलीं असतात. देव्यां-मुळें भिंती हादरून कोसळून पडल्या आणि अपघात झाला तर जबाबदार कोण? शिवाय गतवर्षीप्रमाणें यंदांही नाटक होणार आहे असें ऐकतों. नाटकांतल्या पात्रांनीं देव्यांच्या वेळीं बेंबीच्या देंठापासून ओरडून घसा बसवून घेतल्यामुळें गेल्या वर्षीं नाटकाचा कसा विचका झाला तें आपल्या लक्षांत असेलच. एकच नाटक दोनदां ऐकण्याचा प्रसंग आमच्यावर आला. रंगभूमीवरच्या 'पात्रा' पेक्षां पडद्यां-तील प्रॉम्प्टरचा आवाज मोठ्यानें ऐकूं येत होता. यंदां याची पुनरावृत्ति होऊं नये.

त्याचप्रमाणें गेल्या वर्षीं देवे म्हटल्यामुळें माझा मुलगा बग्या याला दुसऱ्या दिवशीं शाळेंत मार खाण्याचा प्रसंग आला. मास्तरांनीं त्याला कविता म्हणायला सांगितली, तेव्हां त्याच्या तोंडून शब्द फुटेना. 'घसा बसला आहे,' एवढे शब्द सुद्धां बिचाऱ्याच्या तोंडून वेळेवर बाहेर पडले नाहींत. देव्यांचा कार्यक्रम बंद

ठेवला म्हणजे आमच्या मुलांवर असला केविलवाणा प्रसंग येणार नाहीं. सर्व कारणें लक्षांत घेऊन आपण माझी सूचना अंमलांत आणाल अशी आशा आहे.

आपला,—

× × कानफाटे

S S S

## सेक्रेटरींचें उत्तर

रा. रा. लाळघोटे यांस,

सा. न. वि. वि.—

देव्यांच्या कार्यक्रमाचें अजिबात उच्चाटन करण्याची तुमची सूचना अंमलांत आणणें शक्य नाहीं. आपल्याला देवे म्हणतां येतात हें कंठरवानें जाहीर करण्याची संधि न मिळाल्यास उत्सवावर बहिष्कार घालण्यापर्यंत मजल मारणारी कांहीं मंडळी चाळींत आहेत. मात्र दरसालप्रमाणें यंदां देवे येत नसूनही ओरड करण्याची संधि फालतू लोकांना मिळणार नाहीं, अशी तजवीज केली आहे. देवे म्हणूं इच्छिणारांची परीक्षा घेण्याबाबत आजच नोटीस काढली आहे. शाळेंत कविता म्हणण्याचा प्रसंग ज्यांच्यावर गुदरण्याचा संभव आहे, अशा १८ वर्षांच्या आंतील सर्व मुलांस देवे म्हणण्याची बंदी केली आहे. तसेंच नाटकांत काम करणाऱ्या इसमांसही, घसे बसलेले असल्यास नाटकाचा कार्यक्रम अजिबात रद्द करण्याची तंबी दिली आहे. त्याचा इष्ट परिणाम दिसून येईलच. देवे म्हणणारांची संख्या अशा तऱ्हेनें पुष्कळच मर्यादित करण्यांत आली असल्यामुळें भिंती कोसळण्याची भीति उरलेली नाहीं.

आपला,

× × भांबरभुंडे

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ सा. ग.

S S S

## कानफाटे यांचें प्रत्युत्तर

सेक्रेटरी, ग० का० चाळ सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

धोक्याची सूचना दिल्यानंतरही देव्यांचा कार्यक्रम कायम ठेवण्याचा

तुमचा हट्ट दिसतो. ही कटकट टाळण्यासाठीं या भर पावसाळ्याच्या दिवसांत, खर्चाकडे न पहातां, मी बायकापोरांसह माथेरानला जाण्याचें ठरविलें आहे. आजू-बाजूला कोठें गणेशोत्सव नाहीं अशी जागा माथेरानला तरी मला मिळूं शकेल असें वाटतें. माझ्याकडून वर्गणी वसूल करण्याची आशा आतां धरूं नये.

आपला,

× × कानफाटे

× × × ×

## काव्यगायनाविषयीं

### कवि जगमोहन यांचे पत्र

सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ सा. ग. यांस,

सा. न. वि. वि.—

चालू वर्षीच्या गणेशोत्सवांत माझा काव्यगायनाचा कार्यक्रम ठेवण्यांत यावा अशी माझी आग्रहाची विनंती आहे. आपण ती मान्य केली नाहीं तर मला सत्याग्रह करावा लागेल. गतवर्षी माझ्या कार्यक्रमानें मंडपांत दाणादाण उडवून दिली होती हें खरें. पण त्याची जबाबदारी त्या वर्षीच्या नालायक सेक्रेटरीवर येते. चालू वर्षी माझ्या काव्यगायनामुळें मंडपांत ‘ अवघा हलकल्लोळ ’ माजूं नये म्हणून मी एक सूचना आपल्याला करतों. माझ्या कार्यक्रमाच्या आधीं मेळा, आणि नंतर नकला किंवा जादूचे प्रयोग असा कार्यक्रम ठेवावा. म्हणजे लोक जागच्या जागीं चूप बसतील. शिवाय यंदां काव्यगायनाच्या कार्यक्रमानंतर माझ्या कवितासंग्रहाच्या प्रती मोफत वांटण्यांत येणार आहेत, असें जाहीर करावें.

माझ्या कविता लोकांना सर्वस्वी नवीन वाटतील याबद्दल माझी खात्री आहे. कारण इतर कवींप्रमाणें त्या कोठें प्रसिद्धसुद्धां झालेल्या नाहींत. अर्थात् त्या साभार परत पाठविणाऱ्या आमच्या गाजरपारखी संपादकांचे हे एक प्रकारें माझ्यावर उपकारच आहेत. असो.

गेल्या वर्षी लोकांवर माझें इंप्रेशन पडलें नाहीं, याचें कारण माझा गबाळे-पणाही असेल कदाचित्. यंदां ही उणीव मी अंशतः तरी दूर करण्याचें ठरविलें आहे. मात्र माझा कार्यक्रम कोणत्या दिवशीं ठेवता तें अगोदर नक्की कळवावें. कारण माझ्या ओळखीच्या एका परटानें मला एका दिवसापुरते अगदीं स्वस्त भाड्यानें कपडे पुरविण्याचें कबूल केलें आहे. त्यांतून आगाऊ दिवस नाहींच कळ-वितां आला तरी हरकत नाहीं. पण माझ्या कार्यक्रमाला अजिबात फांटा मात्र देऊं नये. मी असतील त्या कपड्यांनिशीं म्हणाल तेव्हां हजर होईन. ' वेष असावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा ॥ ' या समर्थोक्तीवर माझी मदार आहे, इतकें सांगितलें म्हणजे पुरे.

माझा कार्यक्रम ठेवला नाहीं तर मी यंदां गणपतीसमोर अन्नसत्याग्रह करीन हें मात्र खचित समजा.

कवि जगमोहन

× × × ×

## सेक्रेटरींचें उत्तर

रा. रा. जगमोहन यांस,

सा. न. वि. वि.—

आपलें पत्र पोंचलें. तें गद्यांत असल्यामुळें बहुतेक मजकूर समजला. पत्राच्या शेवटीं " वेष असावा बावळा " हें आपण केलेलें आपलें वर्णन मला पटलें. पण " अंतरीं असाव्या नाना कळा " ही काय भान-गड आहे, तें बरोबरसें कळलें नाहीं. आपल्या छातींत मधून मधून कळा येतात, असें कुणीतरी माझ्याजवळ उडतउडत बोलल्याचें आठवतें. पण तें मला कळवून काय उपयोग ? मला कांहीं तुम्हाला मुलगी द्यावयाची नाहीं, कीं मी एखादा डॉक्टरही नाहीं. फारच कळा येत असल्या तर एखाद्या चांगल्या डॉक्टरला छाती दाखवा, एवढाच सल्ला फार तर मी आपल्याला देऊं शकेन.

अन्नसत्याग्रहाचा आपला निर्धार कळल्यानें, यंदां गणेशोत्सवांत आपला काव्यगायनाचा कार्यक्रम ठेवायचा नाहीं असें आम्ही ठाम ठरवून टाकलें आहे. सार्वजनिक सुरक्षिततेच्या दृष्टीनें तर तें इष्ट आहेच. पण चाळींतील सा. गणेशो-त्सवालाही त्याचा बराच फायदा उठवतां येईल. तुमचा अन्नसत्याग्रह बहुधा गणपती-समोरच व्हायचा असेल. अर्थात् आपली बैठक रात्रंदिवस तेथेंच असणार. तसें

झाल्यास आम्हाला दरसालप्रमाणें गणपतीजवळ वेगळा पहारा नेमण्याची जरूरी नाहीं. मात्र दिवसास आमचा एक मनुष्य आपल्या आसपास वावरत राहील. कारण दर्शनाला येणारी मंडळी गणपतीपुढें पेढे, फळफळावळ वगैरे ठेवीत असतात. न जाणों, आपली नजर तिकडे वळून अन्नसत्त्याग्रह व्रताचा भंग होण्याचा संभव आहे.

आपण आरंभिलेल्या अन्नसत्याग्रहापासून दुसरा फायदा म्हणजे व्याख्यानांसारख्या रुक्ष कार्यक्रमांच्या दिवशींसुद्धां लोकांची गर्दी जमण्याचा संभव आहे. काव्यासाठीं प्राण पणास लावणाऱ्या हुतात्म्याच्या दर्शनाला कोण आतुर होणार नाहीं ?

काव्यगायनाचा कार्यक्रम न झाल्यामुळें तुमचें बरेंच नुकसान होण्याचा संभव आहे. पण अनेकांच्या कल्याणासाठीं एकाचा बळी गेला तरी बेहत्तर ! असें नव्हे का ? मला वाटतें तुम्हालाही हें पटेल. तुमच्या काव्यसंग्रहाच्या प्रती तुम्ही मोफत वांटूं इच्छितां, त्या मात्र लोक घेण्यास कबूल असले तर, आम्ही वांटण्याची तजवीज करूं. तुमच्या त्या १० बाय् १२ च्या खोलींत काव्यसंग्रहाचे गठ्ठे म्हणजे एक मोठीच अडगळ होऊन बसली असेल, नाहीं ?

अन्न-सत्याग्रहाचा निर्धार ढळूं देऊं नका. दिवसांतून दोनदां पत्रकें काढून लोक गोळा करण्याची व्यवस्था आम्ही करणार आहोंत. पण तुमचें उपोषण किती दिवसांच्या मुदतीचें आहे तें तुम्ही अजून कळवलेलें नाहीं तेवढे कळवा.

आपला,
×× भांबरभुंडे
सेक्रेटरी, गबदुल कादर चाळ सा. ग.

× × × ×

### कवि जगमोहन यांचें प्रत्युत्तर

सेक्रेटरी, ग. का. चाळ सा. ग. यांस,
सा. न. वि. वि.—

अन्न-सत्याग्रहाची मुदत आगाऊ कळवितां येत नाहीं. कारण कळविलेल्या मुदतीच्या आंतच माझें प्राणोत्क्रमण घडून येण्याचा संभव आहे !

आपला,
**कवि जगमोहन.**

---

## ४ : :  बेकारी-निवारण !

गेले सहा महिने नोकरीच्या शोधार्थ वणवण करून तो अगदी हताश झाला होता. बुडत्याचा पाय खोलांत म्हणतात, तशांतली त्याची गत झाली होती. छापील फॉर्मावर अर्ज करून ते पोस्टानें रवाना करण्यांत त्याचा जो खर्च झाला होता, तेवढ्यांत त्याची एक महिन्याची खाणावळ सहज भागली असती ! पण आतां काय त्याचें ?

त्याच्या खिशांत अवघा एक रुपया राहिला होता. चिंताग्रस्त मनानें तो भ्रमिष्टासारखा रस्त्यांतून हिंडत होता. एकाएकीं एका ठळक अक्षरांची पाटी त्याच्या नजरेस पडली,—

" बेकारी निवारण संघ "

बुडत्याला काडीसुद्धां ' लाइफ बेल्ट 'सारखी वाटते. त्याला वाटलें, आतां आपली बेकारी खचित दूर होणार !

तो तडक ' बेकारी निवारण संघा'च्या कचेरींत गेला, आणि अदबीनें टेबलाजवळ जाऊन उभा राहिला.

एक लठ्ठ शरीराचा इसम " रिकामपणची कामगिरी " वाचीत खुर्चीवर बसला होता. त्यानें पहिल्यांदा नवागत इसमाकडे पाहिलें न पाहिलेंसें केलें.

नंतर थोड्या वेळानें झोपेंतून जागा झाल्याप्रमाणें एकदम मान वर करून, आळस देत तो म्हणाला, " हं, काय काम आहे तुमचें ? "

" कांहीं नाहीं—अं—मी—"

" कांहीं नाहीं ! अहो मग आलांत कशाला इथें ? "

" तसं नव्हे, बाहेरची पाटी पाहून मी आलों आहें. संघाच्या प्रमुखांची मला भेट घ्यायची आहे. "

" मीच तो संघाचा अध्यक्ष. "

" मग माझी एक विनंती आहे आपल्याला. मी एक बेकार आहें. माझी बेकारी आपल्या संघामार्फत दूर झाली तर फार उपकार होतील आपले. "

" अहो यांत उपकार कसले ? संघाचें कार्यच आहे तें. पण या बाबतींत संघाचा एक नियम आहे. नोंदणी फी म्हणून एक रुपया अगाऊ भरल्याखेरीज बेकार उमेदवाराचें नांव नोंदलें जात नाहीं. "

त्याला जरा विचार पडला. पण मनांतील अविश्वासाचें असें प्रदर्शन करणें बरें नव्हे, असा विचार मनांत येऊन त्यानें झटकन् खिशांतला रुपया काढून पुढें केला.

लठ्ठ इसमानें तो घेऊन पेटींत टाकला, आणि नोंदणी वगैरे सर्व संस्कार झटपट आटपून पुन्हा " रिकामपणची कामगिरी " हातीं घेतली.

तो चुळबुळ करूं लागला.

" पण संघामार्फत मला खचित नोकरी मिळेल ना ? " अगदीं काकुळतीच्या स्वरांत शेवटीं त्यानें विचारलेंच.

" तें मी कसें सांगूं ? "

" म्हणजे ? बेकारी—निवारण हेंच या संघाचें कार्य आहे ना ? "

" होय, आणि त्यानें तें आजवर यथाशक्ति बजावलेंही आहे. हा संघ स्थापन करण्यापूर्वी मी स्वतः बेकारच होतों ! "

---

## ५ : : समाजवादाची शिकवण !

सकाळीं चहा पितांना लाम्बणकराच्या भविष्यावर नजर टाकली, आणि वर्तमानपत्र बाजूला फेंकून दिलें. चालू आठवड्याच्या भविष्यांत आजच्या तारखेला, माझ्या राशीला,–'आश्चर्यकारक घटना घडून येतील, ठरलेल्या बेतांत विघ्न येईल, ' असें भविष्य वर्तविलेलें होतें. अर्थातच माझ्या नित्याच्या अनुभवावरून, ' आजच्या दिवसांत आश्चर्यकारक असें कांहीं घडणार नाहीं, सगळे बेत सुरळीत पार पडतील, ' अशी खूणगांठ मनाशीं बांधून मी अगदीं निश्चित राहिलों. पण लाम्बणकराचें भविष्य आज अगदीं तंतोतंत खरें ठरलें. तें खरें ठरलें हीच आधीं एक आश्चर्यकारक घटना होती ! पण रात्रीपर्यंत घडलेल्या इतर घटना त्याहून आश्चर्यकारक होत्या.

वास्तविक यावेळीं,–रात्रीं ९॥ वाजतां, मी एका जाहीर सभेंत 'समाजवाद हाच तोडगा ' या विषयावर व्याख्यान देत असायचा. पण एकाएकीं प्रकृतींत बिघाड झाल्याची सबब पुढें करून, तो कार्यक्रम मीच रद्द केला होता. दोन दिवसांपूर्वी मी व्याख्यान द्यावयाचें कबूल केलें. आणि रात्रींच नव्हे, तर दिवसासुद्धां माझ्या वक्तृत्वपूर्ण व्याख्यानानें उडवून दिलेल्या खळबळीचीं स्वप्नें पहात राहिलों होतों. तो प्रचंड श्रोतृ–समुदाय, टाळयांचा कडकडाट, हंशा, आणि या

सगळ्या हकीकतीचे वर्तमानपत्रांत आलेले रसभरित वृत्तांत गेले दोन दिवस माझ्या डोळ्यांपुढे सारखे नाचत होते. आणि असें असूनही मीच तो कार्यक्रम रद्द करविला होता. ही घटना आश्चर्यकारकच नव्हे तर काय ? अवघ्या बारा तासांत माझें मतांतर झालें, याबद्दल कुणाला आश्चर्य वाटणार नाहीं ?

त्याचें असें झालें,—

सकाळीं ९ वाजतां पोस्टमननें एक पत्र माझ्या हातांत दिलें. पत्रावरील पत्त्याचें अक्षर अगदीं अपरिचित दिसलें. आश्चर्याचा पहिला धक्का बसला ! अतिशय उत्सुकतेनें मीं तें फोडून वाचलें. पत्रांतील मजकूर असा होता,—

× × निवास,
दादर, मुंबई,
ता. ४।९।३८

श्री. शंकरराव भोळे यांस,

सा. न. वि. वि.—

" युगान्तर " मासिकांतली " पोटाचें पाप " ही तुमची लघुकथा मला अतिशय आवडली. यापूर्वी तुमच्या अनेक लघुकथा मी वाचल्या, आणि त्या मला आवडल्याही. सामाजिक, राजकीय, आर्थिक क्षेत्रांत विषमतेनें उडविलेल्या दुर्दशेचें चित्रण आपण अत्यंत कुशलतेनें करतां. आजची लघुकथा तर मला इतकी सरस वाटली कीं, तुमच्या प्रत्यक्ष परिचयाची अत्यंत उत्सुकता लागून राहिली आहे. आपण मला ओळखीत नसाल. पण मी आपल्याला चांगला ओळखितों.

···आपल्यासारख्या थोर गृहस्थांचा महत्वाचा वेळ घेणें उचित नाहीं हें मी जाणतों. पण ज्या गरीब लोकांसाठीं आपण झटतां त्यांतलाच आणि त्यांच्या उन्नतीसाठीं झटणारा मी एक असल्यामुळें......." वगैरे वगैरे. पत्राच्या शेवटीं कॉमरेड घोरपडे अशी सही होती.

पत्र पुरें वाचून झालें तेव्हां तर मला आश्चर्याचा मोठाच धक्का बसला ! कॉमरेड घोरपडे माझ्या भेटीला येणार ! बिचारा सज्जन माणूस ! अजूनपर्यंत मला

त्याचें नांवही माहीत नव्हतें. माझ्या अल्प साहित्यसेवेचा गौरव करण्यासाठीं त्यानें एवढी यातायात करावी याबद्दल मला स्वतःला धन्यता तर वाटलीच, पण त्याच्या थोर मनाची साक्षही पटली.

आणि " युगांतर " मासिकाबद्दलची माझी कृतज्ञता काय वर्णावी ? सगळ्या नियतकालिकांकडून ' साभार परत ' येणाऱ्या माझ्या लघुकथा छापणारीं जीं थोडीं हाताच्या बोटावर मोजण्याइतकीं मासिकें होती, त्यांत ही आणखी एक भर पडली होती ! कां मला आश्चर्य वाटूं नये ?

एका गोष्टीचा मात्र मला थोडा राग आला. माझी लघुकथा छापली असूनही, " युगांतर " च्या त्या अंकाची ' कॉम्प्लिमेंटरी कॉपी ' मला मिळाली नव्हती. पण याचें मला मोठेंसें आश्चर्य वाटलें नाहीं. माझ्या गोष्टी छापणारीं बाकीचीं मासिकेंसुद्धां असेंच करीत. आणि त्यावरून संपादकांचा हा शिरस्ताच असावा असें मी आतां ठरविलें होतें.

शिवाय कॉमरेड घोरपडे आज माझ्या भेटीला येणार होता. माझा आनंद पोटांत मावेनासा झाला होता. मग रागाला तिथें थारा कुठला मिळणार ?

कॉमरेड घोरपडे येणार ! त्याच्या आदरातिथ्याची व्यवस्था करणें हें माझें पहिलें कर्तव्य. पण त्याहीपेक्षां एक महान् साहित्यसेवक असा त्याचा माझ्याबद्दल जो ( गैर )समज झाला होता, तो कायम राखण्याची तजवीज करण्याचें महत्व मला अधिक वाटत होतें.

खोलीची साफसफाई करण्याची कांहीं जरूरी नव्हतीच. माणूस व्यवस्थित असला तर तो लेखक कसला ? राहतां राहिलें दारिद्र्याचें प्रदर्शन. त्याही बाजूनें मला मोठीशी पंचाईत नव्हती ! फर्निचर थोडें जादा होतें, तें शेजाऱ्याच्या खोलींत नेऊन ठेविलें. ( त्याच्या पोरांना तेवढीच एक दिवस चंगळ वाटली ! ) इतर कांहीं हौसेनें खरेदी केलेल्या फोटोफ्रेम्स, फ्लॉवरपॉटस् आणि अशाच चैनीच्या वस्तू होत्या, त्या ट्रंकेंत घालून टाकल्या. टेबलावरच्या " बेबी बेन " घड्याळाचीहि उचलबांगडी करण्याचा विचार होता. पण पांच वाजतां मला एक महत्वाची अपॉइंटमेंट होती. तेव्हां बोलण्याच्या भरांत ती वेळ चुकूं नये म्हणून पांचचा गजर लावून तें टेबलावर ठेवणें मला आवश्यक वाटलें. शिवाय घड्याळ ही कांहीं

अशी चैनीची वस्तू नाहीं, कीं जी लेखकाच्या दरिद्री रहाणीला बट्टा लावील ! असा विचार करून तें मी टेबलावर राहूं दिलें. विषमतेच्या दारुण अनर्थांवर तुटून पडणाऱ्या, समाजवादाच्या पुरस्कर्त्या लेखकाला शोभेल असा पुस्तकसंग्रह मात्र माझ्याजवळ नव्हता. पण लायब्ररींत दहा रुपये डिपॉझिट ठेवून, आणि एका कॉमरेड मित्राच्या गळीं पडून, दोन चार भलीं लठ्ठ लठ्ठ पुस्तकें कशींबशीं जमविलीं आणि तीं टेबलावर व्यवस्थित रचून ठेविलीं. त्याशिवाय बोहऱ्याजवळून दोन दोन आण्याला घेतलेल्या कांहीं इंग्रजी नॉव्हेल्स, व 'स्ट्रँड'–'ग्रँड'चे जुने अंक हेही त्या ढिगाऱ्यांत सामील केले. मला काय माहीत या ढिगाऱ्यामुळेंच माझा घात होणार आहे हें ?

याप्रमाणें माझी खोली मी साहित्यसेवकाला साजेशी सजवली,–किंवा रिकामी केली म्हणा पाहिजे तर !

चार वाजायला झाले. तेव्हां मी माझ्या दोस्ताकडून आणलेलें एक ' सोशॅलिझम ' वरचें पुस्तक उरावर घेऊन आरामखुर्चीत पडलों. थोड्या वेळानें दारावर टिचक्या वाजल्या. मी उठून दरवाजा उघडला. दरवाजांत उभा असलेला माणूस कॉमरेड असला पाहिजे याबद्दल मुळींच शंका नव्हती. पैरण, पायजमा, आणि उघडा माथा हा कॉमरेडचा ' ट्रेडमार्क ' त्याच्याजवळ हाताच. प्रश्न राहिला हा कॉ. घोरपडे आहे किंवा नाहीं.

" या, आपण कॉमरेड घोरपडेच ना ? "

" हो. " तो हास्यमुखानें म्हणाला, आणि कॉमरेडला शोभेशी फाजील सलगी दाखवीत, एखाद्या चिरपरिचित दोस्ताप्रमाणें टेबलाजवळच्या खुर्चीवर येऊन बसला.

" बसा ना असे आरामखुर्चीवर. " मी जरा अदबीनें पण लेखकाची आढ्यता न विसरतां म्हटलें.

" राहूं द्या हो ! बसा तुम्ही. बसण्याची आम्हाला फारशी संवय नाहीं. वेळीं सात सात सभांतून भाषणें केलेलीं आहेत आम्हीं. तुरुंगांत तर काय, बसण्याचें नांवच नको. "

कॅा. घोरपडे ही महान् व्यक्ती यापूर्वी मला माहीत नव्हती, याबद्दल माझी मला शरम वाटूं लागली.

मी आरामखुर्चीवर लवंडलों.

" तुमची गोष्ट आपल्याला फारच आवडली बुवा ! आजच्या विषम समाजरचनेवर तुम्ही या लघुकथेच्या द्वारा फार चांगले कोरडे उडविले आहेत. "

" श्रमजीवि दलित वर्गाच्या कैवारासाठींच लेखणी झिजवायची हा माझा बाणाच आहे. केवळ घटकाभर करमणूक करण्याच्या उद्देशानें मी कधींच कांहीं लिहीत नाहीं. ' जे का रंजले गांजले, त्यांसि म्हणे जो आपुले ' असेच लेखक निर्माण होण्याची आज अत्यंत आवश्यकता आहे, असें माझें ठाम मत आहे. " मी म्हटलें.

" श्रीमंत लोक पैसा असतो म्हणून वाटेल तीं पापें करतात आणि पचवितात; आणि गरीब लोक पैसा नसतो म्हणून पापें करतात, आणि पुष्कळदां समाजाच्या पक्षपाती नीतिनियमांना बळी पडतात, हें तत्व तुमच्या गोष्टींत फार चांगल्या रीतीनें प्रतिपादिलें गेलें आहे. विशेषतः,—' ज्याच्या खिशांत पैसा नाहीं, त्याच्या पोटांत भुकेचा डोंब उसळूं नये, अशी कांहीं व्यवस्था त्या दयाळू परमेश्वरानें केलेली नाहीं. पण तो उसळलेला डोंब शमविण्यासाठीं केवळ नाइलाज म्हणून ज्यांना पाप करणें भाग पडतें, त्यांना स्वर्गाचे दरवाजे बंद करण्याच्या बाबतींत मात्र तो परमन्यायी ईश्वर अत्यंत तत्पर असतो. ' हीं वाक्यें तर फारच परिणामकारक वठलीं आहेत. पण समाजवादाच्या शिकवणुकीच्या दृष्टीने तुमच्या विचारसरणींत एकच मोठी विसंगति मला आढळून आली. ईश्वराचें अस्तित्व साम्यवादी आणि समाजवादी विचारसरणीला मान्य नाहीं, हें तुम्ही विसरलेले दिसतां ! "

"तें तुम्हाला नाहीं समजायचें,—" इतकें बोलून मी एकदम जीभ चावली. माझ्या गोष्टीच्या त्या पहिल्याच आणि एकुलत्या एक चहात्याला दुखवलें तर पुन्हा तो माझें अभिनंदन करण्याच्या मानगडींत कशाला पडेल, हें तेवढ्यांत माझ्या ध्यानांत आलें.

"—देवाचें अस्तित्व मी जरी स्पष्टपणें नाकारलें नसलें, तरी त्याच्याबद्दल थोडा फार तिरस्कारच वाटेल अशी माझी सूचक वाक्यरचना आहे. आणि खऱ्या कलेमध्यें सूचकतेचेंच महत्त्व असतें. असें नव्हे का?" मी जेमतेम वाक्य तडीस नेलें.

"खरं आहे. पोटासाठीं चोरी करणं गरिबांना कसें अपरिहार्य होऊन बसतें, हेंच तुम्हाला या गोष्टींत प्रामुख्यानें दाखवावयाचें आहे. आणि तें तुम्हीं इतक्या चांगल्या रीतीनें मांडलें आहे कीं, थोड्या सरावानें तुम्ही अधिक धीट होऊन फडके-खांडेकरांनांसुद्धां मागें टाकाल. निदान मला तरी याबद्दल शंका वाटत नाहीं. मला वाटतें लौकरच तुमची कादंबरी पण प्रसिद्ध व्हायची आहे एक."

मी कादंबरी लिहिली असल्याचें खुद्द मला अजून माहीत नव्हतें! पण 'संकल्पित' ग्रंथांची यादी खिशांत बाळगीत नसेल तो लेखक कसला? तेव्हां फारसा विचार न करतांच, मी झटकन् म्हणालों,--"हो, आहे तसा विचार! तींतसुद्धां मला हेंच दाखवावयाचें आहे. 'पापपुण्याच्या कल्पना गरीबानांच फक्त भेडसावतात. पण त्यांनाच पापाचा आश्रय करणें भाग पडतें. ज्या समाजानें ही परिस्थिति निर्माण केली त्याच्याच माथ्यावर या दोषांचें खापर...'" वगैरे वगैरे. रात्रीच्या व्याख्यानाची रंगीत तालीमच मी कॉ. घोरपड्यापुढें केली म्हणा ना! बोलून बोलून माझा घसा सुकला. साहाजिकच चहाची आठवण झाली.

कॉ. घोरपड्याकडे वळून मी म्हटलें, "चहा घेतां ना तुम्ही?"

कॉमरेड घोरपडे अशा तऱ्हेनें मान डोलावून हंसला कीं प्रश्न करण्यांत माझा मूर्खपणा झाला, असेंच मला वाटावें.

मी गॅलरींत जाऊन समोरच्या इराण्याला 'दोन पावणा' चहाची ऑर्डर दिली, आणि परत आरामखुर्चीवर येऊन बसलों. थोड्या वेळानें पोऱ्या चहा घेऊन आला.

कॉमरेड घोरपडे एकीकडे एकावर एक चहाचे घोट घेत होता. आणि त्याच वेळीं त्याची परतफेड म्हणून मला स्तुतीचे घुटक्यांवर घुटके पाजीत होता.

मला मनांतून आनंदाच्या उकळयांवर उकळया फुटत होत्या, आणि चहाचे घुटक्यांवर घुटके घेऊन मी त्या आंतल्या आंत दडपून टाकण्याचा प्रयत्न करीत होतों. खरे कलावंत स्तुतीनें चढून जात नसतात !

माझी लघुकथा किती वास्तवपूर्ण आहे हें मला कॉ. घोरपडे सविस्तर समजाऊन देत होता. मी मनांतल्या मनांत हंसत होतों. तो अगदीं रंगांत आला होता.

इतक्यांत त्याच्या पायजम्याच्या खिशांतून घड्याळाचा गजर झाल्या-सारखा वाटला !

मी चपापलों ! मान वळवून टेबलाकडे पाहूं लागलों. पुस्तकांचा ढिगारा आड असल्यामुळे पलीकडचें कांहीं दिसेना. मी ताडकन् उठलो. टेबलावर " बेबी बेन " नव्हतें. कॉमरेड घोरपड्याकडे वळतों, तों तो क्षणार्धात दरवाजा उघडून पळालासुद्धां ! घाईघाईनें जिना उतरतांना तो कोसळल्याचा आवाज कानावर आला.

एका क्षणाच्या आंत मी त्याच्या पाठोपाठ धांवत सुटलों. पुढें कॉमरेड घोरपडे, आणि मागें मी, अशी आमची धांवपळ चालू झाली. रस्त्यांतले बच्चे लोक पोस्टाच्या पेटीसारखे निश्चल उभे राहून आणि 'आ' वासून पहात राहिले होत. पण कोणी त्याला पकडीना.

हां हां म्हणतां तो मला झुकांडी देऊन एका गल्लींत शिरला आणि दिसेनासा झाला.

मी हताश होऊन खोलीवर परत आलों. घड्याळ चोरीस गेलें हें मला पक्कें माहीत होतें. तरी पुन्हा एकदां खात्री करून घेण्याकरितां म्हणून म्हणा, किंवा मला रहावेना म्हणून म्हणा, त्याच्या रिकाम्या जागेकडे एक दृष्टिक्षेप केला. आणि पहातों तों काय,—लाम्बणकराच्या भविष्याचें आणखी एक प्रत्यंतर !

टेबलावरच पुस्तकांच्या ढिगाऱ्याचा पेपरवेटसारखा उपयोग करून एक चिठ्ठी खरडून ठेविलेली होती !

"ज्यांच्या खिशांत पैसा नाहीं...."वगैरे माझ्याच लघुकथेंतलीं वाक्यें चिठ्ठींत उध्दृत करून शेवटीं लिहिलें होतें,—" पोटासाठीं पाप करणाराबद्दल लेखनांत जो सहानुभूति दाखवितो, तो प्रत्यक्ष व्यवहारांत काय त्याला शासन करण्याची इच्छा धरील !......' पोटाचें पाप ' ही तुमची लघुकथा वास्तवपूर्ण आहे किंवा नाहीं याबद्दल साहित्यिकांत केवढीही लाथाळी माजली तरी ती १०० टक्के वास्तवपूर्ण आहे, याबद्दल निदान तुम्हाला तरी आतां शंका राहूं नये !

आपला एक नम्र चहाता,—

कॉ. घोरपडे. "

माझी लघुकथा इतकी परिणामकारक ठरली होती. मग माझ्या व्याख्याना-पायीं कदाचित् याहून मोठा भुर्दंड भरण्याची पाळी यायची ! असा विचार करून, आजारी असल्याच्या सबबीवर मी रात्रीच्या व्याख्यानाचा कार्यक्रम रद्द केला.

## ६ : : त्याचें प्रेमशोधन !

तो एक कवि होता. अर्थात् तो प्रेमाचा भुकेला होता. गल्लीगल्लींतून प्रेमाचा शोध करीत वणवण हिंडण्याचा त्याचा नित्याचा नियम होता. एखादा जनानी हातरुमाल, ब्रूच, निदान केसांत खोंवण्याचा आंकडा रस्त्यांत सांपडेल अशा आशेनें तो रोज निरनिराळ्या बोळांतून आणि गल्ल्यांतून हिंडायचा !

आणि अखेर एका दिवशी त्याची तपश्चर्या फळास आली !

किंचित् मलूल झालेलें एक गुलाबाचें फूल त्याला रस्त्यांत सांपडलें. त्याला परमहर्ष झाला. त्याची पहिली कविता छापून आली त्यावेळचा आनंदही या आनंदापुढें तुच्छ होता !

" थोड्याच क्षणापूर्वी हें फूल एका सुंदर रमणीच्या डोक्यावर आणि भाग्याच्या शिखरावर विराजमान झालेलें असेल. आणि आतां ?–हाय ! हाय ! तें दुर्दैवाच्या खोल गर्तेत, येणाराजाणाराच्या पायदळीं पडलें आहे ! "

त्याला स्फूर्तीचा झटका आला. दाताच्या झटक्याइतकाच तो अनावर होता !

पण त्या सुंदर फुलाच्या सुंदर मालकिणीचें चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें ! ' काय वाटेल तें करून तिला गांठून तिचें फूल तिला परत दिलें

पाहिजे.' असा विचार त्याच्या मनांत येण्याचा अवकाश,—स्फूर्तीचा झटका आंवरून, क्षणार्धांत तो तीरासारखा धांवत सुटला !

त्या वेगानें ऑलिंपिक सामन्यांत पळता तर पहिला नंबर पटकावून बसला असता !

'प्रथम परिचय, नंतर बोलाचाली, नंतर सहवास, नंतर प्रेम आणि नंतर...' त्याच्या पळण्याच्या वेगापेक्षां अधिक वेगानें हीं गोड दृश्यें त्याच्या डोळ्यांपुढून भराभर जात होतीं.

पळत पळत तो नाक्यावर आला. आणि एकाएकीं, 'हॉल्ट' अशी ऑर्डर मिळतांच लष्करी शिपाई जसा चमकून उभा रहावा, तसा समोरचें विलक्षण दृश्य पाहून खाडकन् जागच्या जागीं उभा राहिला.

त्याच्या हृदयाला भयंकर धक्का बसला ! डोळयांपुढें अंधेरी आली !

गुलाबाच्या हारांनीं शृंगारलेल्या एका प्रेताची स्मशानयात्रा समारून चालली होती ! !

त्यानें आपल्या हातांतल्या गुलाबाच्या फुलाकडे पाहिलें.

तों त्याच्यावर मधून मधून गुलालाचा शिडकाव झालेला होता !

---

## ७ : : बर्नार्ड शॉनें न दिलेली मुलाखत

[ जगद्विख्यात आंग्ल नाटककार जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्यावर गेल्या ता. २६ जुलै १९३९ रोजीं शुभेच्छादर्शक संदेशांचा वर्षाव झाला असेल. कारण त्या दिवशीं त्यांचा त्र्यायशींवा वाढदिवस होता. बर्नार्ड शॉ याची मुलाखत मिळविण्यासाठीं कित्येक वृत्तपत्र-प्रतिनिधींनीं त्या दिवशीं जिवाचा आटापीटा केला असेल. प्रत्यक्ष नाहीं तर निदान टेलिफोनवरून त्यांच्या तोंडच्या चार ओळी मिळविण्यासाठीं वृत्तपत्र-प्रतिनिधि धडपडत असतात.

शॉ आणि वृत्तपत्र-प्रतिनिधि यांची टेलिफोनवरून अशी एखादी मुलाखत झाली असली तर तींत पुढीलप्रमाणें संभाषण झालें असेल काय ?

या मुलाखतींतील प्रश्नोत्तरें सर्वस्वी काल्पनिक आहेत. तथापि शॉचें व्यक्तिमत्व आणि विचारसरणी हीं तींत शक्यतों यथातथ्य रीतीनें प्रतिबिंबित केलीं जातील अशीही दृष्टि विनाद साधताना ठेवलेली आहे. ]

शॉ—हॅलॉव्, कोण ?

प्रतिनिधि—मी × × × चा प्रतिनिधि.

शॉ—ओः गॉड! प्रत्यक्ष नाहीं, तर अशा रीतीनें शेवटीं तुम्ही मला गांठलंतच! दीर्घायुष्य लाभल्याबद्दल मला जर कधीं पश्चाताप होत असेल तर तो अशा प्रसंगीं!

प्रतिनिधि—मि. शॉ, वृत्तपत्र—प्रतिनिधींची तुम्हाला खरोखरच का इतकी दहशत बसली आहे?

शॉ—होय. दुसऱ्याचा वेळ खाऊन आपलं पोट भरण्यांत, आणि वर पुन्हा त्याची बदनामी करण्यांत त्याच्याइतका पटाईत दुसरा कुणीही नसेल! चांगल्या विशेषणांचा दुरुपयोग कसा करावा हें फक्त तच चांगल्या प्रकारें जाणतात!

प्रतिनिधि—बरें तें असो. मि. शॉ, आपल्या वाढदिवशीं मी आपल्याला दीर्घायुष्य चिंतितों.

शॉ—हूँ:! जणूं तुमच्यासारख्यांच्या शुभेच्छेच्या बळावरच मी इतकीं वर्षें जगलों! तुमच्या शुभेच्छाप्रदर्शनाबद्दल मी आभारी आहें. पण म्हणून तुम्हाला हवी तशी मुलाखत माझ्याकडून मिळेल असें समजूं नका.

प्रतिनिधि—बरें मि. शॉ, आणखी किती वर्षें जगावें अशी आपली इच्छा आहे?

शॉ—म्हणजे? जगाला इतक्या लौकर,—अवघ्या ८३ व्या वर्षी,—माझा कंटाळा आला असेल असें मला वाटत नाहीं. आणि आला असला तरी मी जगाला कंटाळलों नाहीं अजून.

प्रतिनिधि—आपण गैरसमज करून घेत आहांत. आपण जेवढीं वर्षें जगाल तेवढीं थोडींच असेंच कुणालाही वाटेल. लोक आपल्याला इतके चहातात—

शॉ—( मध्येंच ) हें ऐकून मला शरम वाटते. दांभिक माणसांनीं माझी चहा करण्याची बिलकुल जरूरी नाहीं. त्यांनीं त्यांच्या दांभिक समाजव्यवस्थेला बळी जाणाऱ्या माणसांकडेंच अधिक लक्ष पुरवावें.

प्रतिनिधि—मरणाचा प्रश्न आपल्या मर्जीवर संपवला तर आपण किती वर्षें जगूं इच्छितां हें कृपा करून सांगाल काय?

शॉ—होय. ढोंगबाजीचा अंत होईपर्यंत. माझी मनोमय आदर्श सृष्टि डोळ्यांनीं पाहीपर्यंत! जगांतला प्रत्येक मनुष्य बर्नार्ड शॉ होईपर्यंत!

प्रतिनिधि—बरें,आतां आपल्याला किरकोळ परंतु उचित (Reasonable) असे कांहीं प्रश्न मी विचारूं इच्छितों.

शॉ—ते अनुचित असतील तर फार चांगलें.

प्रतिनिधि—खरेंच, तें अधिक कठीण आहे. मला असं विचारायचं आहे कीं, मांसाहाराचा,—किंवा आपल्या भाषेंत सांगायचं म्हणजे ' मेलेलीं जनावरें खाण्या'चा, आपण अत्यंत तिरस्कार करतां. मांसाहाराचा आपल्याला अनुभव नसतांना तो इष्ट नाहीं हें आपण कसें ठरविलें ?

शॉ—कॉमन सेन्सच्या आधारावर ! चॉकलेटच्या वड्या खाव्या, पण तोळाभर बचनाग खाऊ नये हें आपण जसें ठरवूं शकता तसेंच !

प्रतिनिधि—बरें आतां दुसरा प्रश्न. ' मुलें ही एक मोठी जबाबदारीची बाब आहे असें बोलून दाखवणारे लोक मूर्ख आहेत वस्तुस्थिति तशी नाहीं. ' असें मत आपण पूर्वी व्यक्त केलें आहे. परंतु तुम्ही उमेदींत आल्यानंतरही तुमच्या खर्चाची जबाबदारी तुमच्या आईनें संभाळली होती. हें खरें काय ?

शॉ—होय. आणि तसें करून तिनें माझें मोठें नुकसान केलें आहे. माझ्याकरतां खर्च करण्याचें तिनें नाकारलें असतें, तर खचित माझें मी पाहून घेतलें असतें. आतां मात्र केवळ आई होती म्हणूनच माझा निभाव लागला असें म्हणायला लोकांना जागा झाली आहे आणि आईचें ऋण जन्मभरच काय, पण जन्मानंतरही माझ्या माथ्यावर लादलें जाणार आहे.

प्रतिनिधि—बरें आतां मी एक कांहींसा वैयक्तिक स्वरूपाचा प्रश्न विचारतों. परंतु माझ्यासारखाच अनुभव आणखीही कित्येकांना आला असेल ' पैशाची फिकीर करूं नका,—म्हणजे पैशांचे ढीग तुमच्यापुढें पडतील. ' हें आपलें एक आवडतें सूत्र आहे. मी स्वतः पैशाची फिकीर कधीं केली नाहीं पण भरपूर पैसे मला अद्यापपर्यंत कधींच मिळाले नाहींत. आपलें यावर काय म्हणणें आहे ?

शॉ—तुमच्या प्रश्नातच त्याचें उत्तर आहे. तुम्हाला पैशाची फिकीर नाहीं, तर तुम्ही मला हा प्रश्न का करतां ?

प्रतिनिधि—बरें, आपण हल्लीं जें नवीन नाटक लिहिलें आहे, तें बेकार नटांची सोय लावण्याच्या उदात्त उद्देशानें नुकत्याच स्थापन झालेल्या × × × नाट्यसंस्थेला मोबदल्याविना देण्याचा आपला विचार आहे हें खरें काय ?

शॉ—नाटककारानें नाट्यसंस्थेकडून पैसे उकळायचे असतात. नाट्यसंस्थेनें नाटककाराला गंडा घालायचा नसतो. हा प्रघात मोडण्याचें मला कारण दिसत नाहीं. माझे विचार खुद्द मला माहीत नसतात; आणि लोकांना मात्र ते कळतात याचें मला आश्चर्य वाटतं !

प्रतिनिधि—बरं, आतां हा शेवटचाच प्रश्न. आपल्या पश्चात् आपली मृत्युतिथि लोकांनीं साजरी करावी असें तुम्हाला वाटतें काय ?

शॉ—त्याची बिलकुल जरूरी नाहीं. माझ्या आत्म्याला मृत्यूनंतर तरी शांति मिळावी अशी यत्किंचित् इच्छा असल, तर माझ्या नांवाखालीं व्याख्यानबाजी करून स्वतःचें पांडित्यप्रदर्शन करण्याचा मोह लोकांनीं आंवरावा. त्यांना माझी जी कांहीं विटंबना करायची असेल ती त्यांनीं मी जिवंत असतांनाच करून घ्यावी.

प्रतिनिधि—आभारी आहें. आपल्यासारख्या थोर माणसाचा अधिक वेळ घेणें उचित नाहीं.

शॉ—( उमळून ) मला शिव्या देण्याचें तुम्हाला कारण नाहीं. मी थोर माणूस नाहीं. माणसें स्वतः थोर होत नसतात; लोक त्यांना थोर बनवीत असतात. उदाहरणार्थ,—मी. आणि लोक तसें करतात त्याला पुष्कळदां कांहीतरी कारणें असतात. उदाहरणार्थ,—मुलाखत ! जगासाठीं कुणी कधीं थोर बनत नाहीं स्वतःच्या आशा-आकांक्षांच्या पूर्तीसाठीं झगडतांना माणूस त्याच्या ध्यानींमनीं नसतां मोठा बनत असतो हें लक्षांत ठेवा !

प्रतिनिधि—आतां आपल्या इच्छेनुसार आपल्याला एक अनुचित प्रश्न विचारतो.

शॉ—शब्दांचे अर्थ आजकाल फॅशन्सपेक्षांही झपाट्यानें बदलूं लागलेले दिसतात. यापुढचा आपला कितवा प्रश्न मी शेवटचा समजूं ? कीं शेवटचा प्रश्न आपण सुरुवातीलाच विचारून टाकला आहे.

प्रतिनिधि—नाहीं. आपण थोर माणूस नाहीं, त्याअर्थीं मला वाटतें, आपल्याला थोडी सवड मिळूं शकेल. मी आपल्या प्रत्यक्ष मुलाखतीला येऊं काय ?

शॉ—आभारी आहें आपला. आगाऊ कळवलेंत बरें झालें. आतां आपण येण्याच्या आत मी खुशाल बाहेर जाऊं शकतों ! तुमचा उद्यांचा अंक प्रसिद्ध झाल्यावरच घरीं परत येईन ! गुड् बाय् !

---

## ८ : : भविष्याचा पडताळा !

त्याचा तो सुतकी चेहरा पाहून त्याच्या मित्रांनां मोठें आश्चर्य वाटलें !

कारण त्याचा कोणी दूरचासुद्धां नातेवाईक दगावल्याचें त्यांच्या ऐकिवांत नव्हतें. उलट आदल्या दिवशीं त्याला लॉटरींत पंचवीस हजार रुपयांचे बक्षिस लागल्याची कुणकुण मात्र त्यांच्या कानावर आली होती.

आपल्या सगळ्या मित्रांनीं फारा दिवसांनीं आज एकदम आपल्या घराकडे मोर्चा वळविलेला पाहून त्यालाहि आश्चर्य वाटलें. आणि त्यांतल्या एका मित्रानें जेव्हां त्याला विचारलें,—" काय रे, तुला लॉटरींत पंचवीस हजार रुपये मिळाले म्हणे ! " तेव्हां तर त्याच्या आश्चर्याला सिमाच राहिली नाहीं !

कारण पंधरा दिवसांपूर्वीं लॉटरीचीं दोन तिकिटें त्यानें विकत घेतलीं होतीं खरीं; पण ती गोष्ट त्यानें अजूनपर्यंत अतिशय गुप्त राखली होती.

" हूंः ऽ ऽ " एक सुस्कारा टाकून, कपाळावरच्या आठ्यांची संख्या वाढवीत तो म्हणाला, " पण तुम्हांला कसं कळलं ? "

आणि त्याचे मित्र कांहीं उत्तर देणार तोंच तो डोक्यांत ' नवा प्रकाश ' पडल्यासारखा चमकून उठला आणि तडक स्वैंपाकघरांत गेला.

" माझं पैशांचं पाकीट काढलं होतंस तूं केव्हां ? " त्यानें रागानेंच तिला विचारलें.

" हो. परवां भाजीला पैसे नव्हते म्हणून एक आणा घेतला मी त्यांतला."

" आणि आणखी काय काय काढलं होतंस त्यांतलं ? "

" कांहीं नाहीं. हो,—खरं तीं लॉटरीचीं तिकिटं—"

" हं, तीं तूं पाहिलींस ? तरीच ! आतां उलगडा झाला, उभ्या गांवांत कसा बोभाटा झाला तो ? तुम्ही बायका अशाच बेअकली ! "

तो तणतणत बाहेर आला, आणि कपाळाला हात लावून पलंगाच्या एका कोंपऱ्यावर बसून, पुन्हा त्रासिक मुद्रेनें विचार करूं लागला.

" अरे, असा वैतागलास कां ? आणि सुतक्यासारखा चेहेरा करून सारखा विचार कसला चालवला आहेस ? पंचवीस हजारांचें बक्षीस तुला मिळालं हें खरं नाहीं का ? " त्याचा बुचकळ्यांत पडलेला मित्र म्हणाला.

" बक्षिस मिळालं रे. त्यांत काय मोठंसं ? पण तें दुसरं तिकीट,—त्याचाच मला पश्चात्ताप होतो. कुठून तें विकत घ्यायची दुर्बुद्धि मला झाली कोण जाणे ! फुकट गेला तो रुपया ! म्हणूनच पण कराच्या भविष्यात चालू महिन्यांत ' द्रव्यहानि ' होतीच माझ्या राशीला ! "

---

## ९ : : त्याचा प्रसिद्धि–विक्रम !

वेळ असो अवेळ असो, योग्य असो अयोग्य असो, 'येन केन प्रकारेण' स्वतःची "पब्लिकसिटी" करून घेण्याची एकहि संधि वांया न घालविण्याचा त्याचा बाणा होता. स्वतःचें नांव वर्तमानपत्रांत छापून आणण्यासाठीं आगगाडीखालीं जीव द्यायलाहि त्यानें माघार घतली नसती, मग 'संपादक' म्हणून प्रसिद्धि मिळविण्यासाठीं त्यानें एक मासिक काढून तें बुडविण्याचें धाडस केलें यांत नवल कसलें ?

आठ घटकेचा अयशस्वी संपादक म्हणून तो लोकांत प्रसिद्धि पावला ! पण स्वतःची प्रसिद्धि करून घेण्याचें त्याच्या हातीं असलेलें एकुलतें एक साधन नाहींसें झालें ! तरी तो डगमगला नाहीं.

महत्प्रयासानें त्यानें एका दैनिकाच्या कचेरींत उपसंपादकाची जागा मिळविली, आणि प्रसिद्धिसंपादनाचें आपलें अंगीकृत कार्य नेटानें पुढें चालू ठेविलें. पण दुर्दैव त्याचें ! त्याच्या लायकीविषयीं मतभेद झाल्यामुळें संपादक त्याला प्रूफ-करेक्टर म्हणूनच राबवून घेऊं लागले !

तरीहि त्यानें धीर सोडला नाहीं. "Not failure but low aim is crime" ही उक्ति त्याला जशीच्या तशी आठवणें शक्य नव्हतें. तरी पण

तिचा गोळाबेरीज अर्थ त्याच्या ध्यानीं होता. नाना प्रकारच्या युक्त्या योजून "गर्जना" दैनिकाचें सर्व काम आपणच पहातों, असें तो लोकांना भासवीत असे. संपादक आणि उपसंपादक कचेरींत येण्यापूर्वी, आणि ते निघून गेल्यावर त्यांच्या खुर्चीत बैठक मारून त्यानें कैक लोकांना बनविलें होतें.

शालोपयोगी गद्यपद्यार्थ, बालोपयोगी अंकलिप्या, मेळ्याच्या पद्यावल्या वगैरे ग्रंथांपासून तहत मुखविलास जर्दा, बादशाही मबू, सुगंधी उटणें, ओलें कुंकूं, वगैरे साहित्यापर्यंत सर्वांवर अभिप्राय लिहिण्याच्या निमित्तानें तो "गर्जना" दैनिकांत वारंवार आपलें नांव छापून आणीत असे. शिवाय इतर अनेक 'गरजू' नियतकालिकांतहि, आपल्या नांवापुढें "सहसंपादक—गर्जना" अशी पुरवणी बेधडक जोडून कांहीं तरी लिहीत असे. अडला संपादक छापीत असे त्याचें लिखाण बेधडक !

लेखनाचें क्षेत्र प्रसिद्धीला अपुरें वाटल्यामुळें अलीकडे तो वक्तृत्वहि करूं लागला होता. घातक वैद्यनियंत्रण बिलाच्या सभा, चाळींतील गणेशोत्सव, गल्लींतील दुखवट्याच्या सभा, मुलामुलींच्या मेळ्यांचे बक्षीससमारंभ, असल्या सभा--समारंभांना निमंत्रण नसूनहि तो हजर रहात असे, आणि गर्जून भाषणें करीत असे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, समंजस आणि सुबुद्ध लोक ज्या सभा--समारंभांची उपेक्षा करीत असत, त्यांना तो जातीनें हजर राहून उत्तेजन देत असे. इतकेंच नव्हे तर संपादक—उपसंपादकांच्या गैरहजरींत रातोरात त्यांचे रिपोर्ट स्वहस्तानें लिहून ते "गर्जना" दैनिकांत छापून आणीत असे. मात्र रिपोर्टांत दर दोन तीन वाक्यांगणिक आपलें संपूर्ण नांव घुमडण्याची तो पूर्ण खबरदारी घेत असे (आणि कोणी म्हणत कीं, त्यासाठींच तो रिपोर्ट लिहीत असे !) अशा मजकुरांत त्याला स्वतःलाच ज्यांचा अर्थ कळत नव्हता, असे अगडबंब शब्दहि तो मुबलक पेरीत असे. त्यामुळें उपाक्षित सभा--समारंभांच्या चालकानांच नव्हे तर इतर वाचकांनाहि आपल्या विद्वत्तेबद्दल वचक वाटतो, अशी त्याची समजूत होती. आतां इतर वाचक तो मजकूर वाचीत नसत ही गोष्ट त्याच्या आटाक्यांतली नव्हती !

प्रसिद्धीसाठीं त्यानें चालविलेली ही तडाखेबंद चळवळ अगदींच वांयां जात होती असें नाहीं. लेखक आणि वक्ता म्हणून नाहीं, तरी प्रसिद्धीला हपापलेला एक

आशाळभूत म्हणून लोकांत तो खरोखरच प्रसिद्धि पावला होता. बहुतेक सर्व संपादकहि त्याला चांगलेच ओळखूं लागले होते. कारण त्याचें लिखाण साभार परत पाठविण्याचा प्रसंग त्यांच्यावर अनेक वेळां आला होता !

पण अलीकडे कित्येक दिवस तो अगदीं खिन्न दिसत असे. त्याला कसली तरी भयंकर काळजी लागली होती. असे कित्येक दिवस लोटले. त्याच्या काळ-जीचें कारण कोणालाच समजलें नाहीं. एके दिवशीं संध्याकाळीं त्याला ऑफि-सांतच थंडी भरून ताप आला. पण सगळे संपादक—उपसंपादक घरीं निघून जाण्याची वाट पहात तो ऑफिसांतच बसून राहिला.

संपादकांच्या ऑफिसांत सामसूम झाल्यावर त्यानें मुख्य संपादकाच्या खुर्चीवर आपली बैठक मारली. कागद, दौत, टांक, विड्या वगैरे साहित्य सरसा-वून तो तडाख्यानें लिहूं लागला. तब्बल चार कॉलम लिहून होईपर्यंत त्यानें मान वर केली नाहीं. काय पांच सात विड्या फुंकल्या असतील त्यासुद्धां खालीं मान घालून !

मजकूर पुरा होतांच त्यानें त्याच्यावर लेखक म्हणून आपलें संपूर्ण नांव घातलें. "सहसंपादक—गर्जना" अशी पुरवणीहि नांवापुढें जोडली. त्याच्या चेहऱ्यावर खिन्नतेचा लेश दिसत नव्हता. त्याला पराकाष्ठेचा आनंद झाला होता. त्या भरांत त्यानें फोरमनला ( कंपॉझिटरांचा मुकादम ) मोठ्यानें हांक मारली.

"हं, हा घे मजकूर ! जशाचा तसा कंपोज कर. गाळूं नकोस काना-मात्रासुद्धां ! आणि खालीं—वर चांगल्या जाड रुळा टाक."

"पर ता कसला मजकूर ?" फोरमननें पृच्छा केली.

"मृत्युलेख आहे." गंभीर स्वरांत प्रसिद्धिपंडित म्हणाला.

"कुणाचा ?"

"माझा !"

आपल्या हयातींत आपण स्वतःची वाटेल तशी प्रसिद्धि करून घेतली; पण आपण इहलोक सोडून गेल्यावर, आपला मृत्युलेख लिहून आपल्याला प्रसिद्धि कोण देणार, हीच घोर काळजी त्याला गेले कित्येक दिवस लागली होती. पण आज त्याला युक्ति सांपडली. आज त्यानें मृत्यूवर मात केली होती !

" पर हा छापायचा केव्हां ? " आश्चर्यानें हतबुद्ध झालेला फोरमन पुन्हा म्हणाला.

प्रसिद्धिपंडित जरा गोंधळला. पण थोडा विचार करून लगेच तो म्हणाला, " छापून टाका आजच ! "

' आपण रात्रीं मेलों नाहीं, तर उद्यां जिवंत असल्याचा खुलासा करूं. तेवढाच प्रसिद्धीचा चान्स आणखी ! ' त्यानें मनांत विचार केला.

फोरमननें पुनः एकदां त्या मजकुरावरून नजर फिरवली. आणि आतां त्याला पहिल्यापेक्षां फार मोठा आश्चर्याचा धक्का बसला. आश्चर्यमिश्रित स्वरांतच तो प्रश्नसमंध म्हणाला,—

" आणि हें तुमचं नांव कशाला त्याच्यावर ? "

" कुठं ऽ ऽ ! अर्रर्र, सवयीचा परिणाम ! !"

---

## १० : : विरह !

विसाव्या शतकाच्या चवथ्या दशकांतली गोष्ट आहे ही. माकडासारख्या मनुष्येतरांबरोबर, किंवा ढगासारख्या अचेतनांबरोबर निरोप पाठवून, विरही वल्लभानें वियुक्त वल्लभेला आपल्या अंतरींच्या व्यथा कळविण्याचे दिवस, काळाच्या विशाल उदरांत गडप होऊन कित्येक हजार वर्षे लोटलीं होतीं. पण अनादि कालापासून आढळून आलेला प्रणयिजनांच्या हृदयाचा कमकुवतपणा मात्र काळाच्या प्रचंड आघातांतही आपलें अस्तित्व अजून कायम टिकवून राहिला होता. काळ सर्वभक्षक असेल; पण प्रीतीनें त्याच्यावर मात केली होती !

त्या जुनाट काळाप्रमाणें या विसाव्या शतकांतही, विरहाच्या व्यथा प्रणयी जीवांना अगदीं तितक्याच दारुण उत्कटतेनें हैराण करीत होत्या. माकडांपेक्षां आणि ढगांपेक्षांही वेगवान् असा विद्युत्दूत या जगात अवतीर्ण झाला होता. पण निरोपाच्या दर शब्दागणिक आगाऊ पैसे मोजून घेतल्याखेरीज फुकटंफाकट ‘ दौत्य ’ करण्याचा त्याचा शिरस्ता नव्हता. शिवाय या विद्युत्दूताला म्लेंच्छांच्या भाषेखेरीज अन्य भाषा अवगत नव्हती त्यामुळें प्रणयी जीवांनीं त्याच्याबरोबर विश्वासानें, परस्परांकरतांच फक्त, पाठविलेल्या नाजुक निरोपांची परिस्फुटता होण्याचा दाट संभव होता

वल्लभ—वल्लभा झाली म्हणून काय झालें? अशा परिस्थितींत त्यांनीं विद्युद्दूताचा विश्वास धरून त्याच्याबरोबर परस्परांना निरोप पाठविण्यास धजावें तरी कसें? या आणि अशाच इतर अनेक अडचणींमुळें, प्रणयी जीवांनीं आपली विरहार्त मनःस्थिति एकमेकांना कळविण्याची कामगिरी विद्युद्दूताकडे सोंपविल्याचा दाखला आजतागायत दुसरीं आढळत नाहीं.

अशा या अडचणीच्या काळांत, चिंतोपंत म्हणून ओळखला जाणारा एक मानवप्राणी एका संध्याकाळीं ऑफिसांतून दमूनभागून आपल्या खोलीवर परत आला, आणि दरवाजाचें कुलूप काढून खोलींत प्रवेश करता झाला. आंत शिरतांच अंगांतले कपडे काढून, ते त्यानें खुंटीवर भिरकावले. पूर्वी चिंतोपंत ते कॉटवर भिरकावीत असे. पण तसें केल्यास रात्रीं झोंपतांना ते आपल्यालाच पुन्हा खुंटीवर ठेवावे—किंवा भिरकवावे—लागतात, हें अनुभवास आल्यावर अलीकडे त्यानें आपल्यांत ही सुधारणा केली होती.

हा ठरीव कार्यक्रम रीतसर पार पाडल्यानन्तर ‘हुश्ऽऽ’ करीत, तो कॉटवरच्या कित्येक दिवसांत न गुंडाळलेल्या बिछान्यावर आडवा झाला. क्षणभरच बिछान्याला पडलल्या सुरकुत्या मोजण्यांत त्याचें मन रमलें. पण नंतर अगदीं नकळत त्याची नजर समोरच्या भिंतीवर टांगलेल्या आपल्या पत्नीच्या भव्य छायाचित्राकडे ( एन्लार्जमेंटकडे ) गली.

हाय!—त्याची ती ‘अन्नपूर्णा’ मुंबईहून पुण्यास आपल्या माहेरीं गेल्याला पुरे आठ दिवस लोटले होते! आणि आणखी निदान दोन महिने तरी ती परत येण्याचा संभव नव्हता!

कारण कालच त्याच्या निर्दय सासऱ्यानें, ‘तिच्या आईच्या बाळंतपणासाठीं तिला निदान दोन महिने ठेवून घेण्याचा’ आपला बेत त्याला पत्रानें कळविला होता. विरहाच्या या दुष्ट जाणिवेनें त्याचें अंतःकरण शतधा विदीर्ण झालें.

ते उदासवाणे विचार आंतल्या आंत दाबून दडपून टाकण्याला एकच इलाज होता. वरून गरम चहाचा मारा करून त्या विचारांना आंतल्या आंत

गुदमरवून टाकण्याचा त्यानें ठाम निश्चय केला. चहा, अहाहा, हताश जीवाला नवचैतन्य देणारी पृथ्वीवरची तो संजीवनी,–तिच्या स्मरणानेंच त्याचें मन किती उल्लसित झालें !

पण हाय ! येथेंही त्याचें दुर्दैव उभें राहिलें ! सगळी जुळवाजुळव करून त्यानें 'स्टो'ला कांकडा लावला. आणि आतां तो पेटविणार, तोंच एकाएकी तो भडकला. महत्प्रयासानें त्यानें पिन् शोधून काढली. एकदां, दोनदां, तीनदां पिन् केली. पण 'स्टो' पेटण्याचें लक्षण दिसना. तो वैतागला. 'स्टो' उचलून त्यानें बाजूला आदळला. आणि या भानगडींत त्याच्या लक्षांत आलें कीं, 'स्टो'मधील तेल अजिबात संपलें आहे.

भडकलेला स्टोव्ह विझला आणि मग त्याच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला कीं, खोलींत, आणि बाहेरही दाट अंधार माजला आहे. त्यानें घाईघाईनें खाणावळीची वाट धरली तो पानावर ( म्हणजे पाटावर ) बसला. पण त्याचें जेवणांत लक्ष नव्हतें. आणि आमटींत झुरळ सांपडलें नसतें तर तें अजिबात ठिकाणावर आलें नसतें.

" मालक, " त्यानें चढ्या सुरांत हांक मारली.

मालकांच्याऐवजीं बाळकोबा आचारी दरवाज्यात येऊन उभा राहिला.

" हें बघा बाळकोबा, " तो चिडक्या स्वरात म्हणाला, " तुम्हाला मेंबर लोकांनीं जास्त आमटी खायला नको असेल तर पाटल्यास तिखट जरा जादा घाला पण हें–हें काय ? हा मसाला कशाला या आमटींत ? "

त्यानें तें झुरळ एक तंगडी धरून, हात लांब करून प्रदर्शनार्थ सर्वांसमोर धरलें.

" छे हो, कोकमसाल असेल ! " असें म्हणून, बाळकोबा वाढपाच्या लगबगींत असल्याचा अभिनय करीत क्षणार्धात तेथून निसटला.

ताट तसेंच टाकून तो पानावरून उठला, आणि खालीवर परत येऊन अस्वस्थ मनानें आरामखुर्चीत पडला. उदासवाण्या विचारांनीं त्याच्या मनांत एकच गर्दी केली.

'ती' आज येथें असती तर ? तर ही अनर्थपरंपरा आपल्यावर ओढवलीच

नसती ! त्याच्या कापसासारख्या मऊ हृदयांत या उदासवाण्या विचारांची ठिणगी पडतांच तेथें विरहाग्नीनें एकदम भडका उडवून दिला !

थोड्या वेळापूर्वी भडकलेला स्टाव्ह कदाचित् याच भावी अशुभाचा सूचक असेल काय ?

तो अगदीं बेचैन झाला. त्याची तळमळ कांहीं थांबेना. तो ताडकन् खुर्चीवरून उठला. कुणाला वाटेल कीं, आरामखुर्चीतील ढेंकणांनीं सडकून चावे घेतल्याचाच हा परिणाम असावा. पण त्याची पुढील हालचाल लक्षांत घेतां तसें म्हणणें गैरशिस्त ठरेल !

कोटाच्या खिशांतून त्यानें आपली रोजनिशी बाहेर काढली, आणि तो तडक टेबल खुर्चीकडे वळला. रोजनिशींतील त्या तारखेचें पान उघडून आणि डोळ्यांतील आंसवें धोतराच्या सोग्यानें पुसून तो लिहूं लागला,—

" बाहेर अंधार मी म्हणत आहे. आंत मी ' अंधार ' म्हणत आहें. लाडके वसू, ( वसुमती याचें संक्षिप्त रूप ) या वेळीं तूं काय बरें करीत असशील ? पुरुषासारखा पुरुष असून, विरहामुळें माझी किती चमत्कारिक अवस्था झाली आहे बरें ? मग माझ्या विरहामुळें तुझी काय दशा झाली असेल ? कल्पनाच करवत नाहीं. किंवा कल्पना करण्याचें कारणच नाहीं ! तुला सगळें जग शून्य भासत असेल. तुझ्या दृष्टीपुढें अंधार माजला असेल. कदाचित्—अथवा शंका कशाला ? नक्कीच,—तूं अन्नपाणी वर्ज्य केलं असशील. तुझ्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वहात असतील. कामांत व्यग्र असतांना कांहीं वेळ तुला माझा विसर पडत असेल. पण सगळें कामधाम आटपून मोकळा वेळ सांपडल्यावर दुपारीं,—ज्यावेळीं माझ्या अंगांतून घामाच्या धारा वहात असतात तेव्हां, तुझ्याही डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वहात असतील. ते तुझे अश्रू......"

वगैरे वगैरे यथेच्छ लिहून, त्यानें टांकाच्या टोंकांतून ठिपकणाऱ्या शाईच्या रूपानें जणूं आपलें हृदयच त्या रोजनिशींत ओतलें. आणि मग त्याचें मन पुष्कळच हलकें झालें. एरंडेल घेतल्यावर कोठा साफ होऊन जशी हुषारी वाटावी तशी त्याला वाटली. त्यानें बिछान्यावर अंग टाकलें, आणि एका क्षणांत तो घोरूंही लागला !

× × × ×

## विरह !

चिंतोपंतानें आपल्या विरही वल्लभेचें जें चित्र रोजनिशींत कल्पनेनें रंगविलें होतें, तें अक्षरशः खरें होतें. कोणाचा कदाचित् विश्वास बसणार नाहीं, पण त्यांत एक अक्षरही खोटें नव्हतें!

चिंतोपंत आपली रोजनिशी लिहीत होता, त्यावेळीं त्याच्या लाडक्या वसूच्या डोळ्यांपुढें अक्षरशः घनघोर अंधार माजला होता. कारण त्यावेळीं ती आपल्या दादावाहिनींबरोबर 'आर्यन टॉकीज' मध्यें 'शिनेमा' पहात होती!

तिनें अन्नपाणी वर्ज्य केलें होतें, हें निदान त्या वेळेपुरतें तरी खोटें नव्हतें. कारण दुपारींच ती शेजारीं सव्वाष्ण म्हणून गेली होती, आणि तेथें साखरभातावर आडवा हात मारल्यामुळें संध्याकाळीं पुन्हा जेवण्याचें त्राण तिच्या अंगांत राहिलें नव्हतें. त्याचप्रमाणें दुपारचें जड जेवण पचविण्यासाठीं पाण्याऐवजीं सोडा पिणें अपरिहार्यच होतें!

डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहण्याबाबतहि चिंतोपंताचा अंदाज चुकीचा नव्हता. दुखऱ्या डोळ्यांतील खुपऱ्या वाढल्या असूनही सौ. चिंतोपंत त्या रात्रीं सिनेमा पाहायला गेल्या होत्या. आणि आपल्या वीतभर लांबीरुंदीच्या रुमालानें मधून मधून सारखे डोळे पुशीत होत्या.

हें तर काय? पण रोज दुपारीं आपली लाडकी वसू डोळ्यांतून अश्रूंच्या धारा गाळीत असली पाहिजे ही चिंतोपंताची समजूतही बिलकुल चुकीची नव्हती. कारण रोज दुपारीं,— ज्यावेळीं चिंतोपंताच्या अंगांतून घामाच्या धारा वहात असत त्यावेळीं,— आपले आवडते कांद्याचे पोहे करण्यासाठीं कांदे चिरतांना, बिचाऱ्या वसूच्या डोळ्यांतून टिपें गळल्याशिवाय कधींच राहिलीं नाहींत!

---

## ११ : : शापाची शोभा !

### [ एक हंगामी गद्धेकाव्य * ]

श्रीगणेशा !—

कशाला वहातोस आपल्या सामर्थ्याचा वृथा डौल ? तुझा शाप फोल ठरला आहे. आभाळाकडे नजर लावून बसायला मी कांहीं एखादा शेतकरी नाहीं. पोटाच्या पंचायतीनें पिडलेला, शेतकऱ्याहूनही लाचार बनलेला, एक दरिद्री दीनदुबळा बेकार पामर आहें. तरी पण तुझ्या जन्मदिवशीं मी चांगला एक घंटाभर आभाळाकडे टक लावून पहात ताटकळत बसलों होतों. शेवटीं चंद्र उगवला एकदांचा. एखाद्या भूलोकसुंदरीच्या मुखचंद्राचें दर्शनही जितक्या आस्थेनें मी कधीं घेतलें नसेल इतक्या आस्थेनें, निरनिराळे दृष्टिकोन साधून, मी त्या चंद्रकोरीचें दर्शन घेतलें. मनांत म्हटलें, माझ्या कामगिरीचा ' श्रीगणेशा ' तर झाला ! पण व्यर्थ. कोणीच माझ्यावर आळ घेतला नाहीं !

---

* गद्यकाव्याच्या चहात्यांनीं हा शब्द ' विडंबनकाव्य ' या अर्थीं वापरला आहे असें समजावें. विडंबनकाव्य च्या चहात्यांनीं तो ' गद्यकाव्य ' या अर्थीं वापरला आहे असें समजावें. दोन्ही प्रकारांच्या चहात्यांनीं हा एक नवीन वाङ्मयप्रकार आहे असें समजावें.

## शापाची शोभा !

हीच का तुझ्या शापाची शोभा ?
जगांत तुझ्या आणि माझ्या शब्दाची किंमत सारखीच ठरली आहे.

हे विघ्नहर्त्या !—

कशाला स्वतःला विघ्नहर्ता म्हणवितोस ? तुझ्या शापाचे धिंडवडे होण्याचा समय समीप येऊन ठेपला, कोणत्याही काँग्रेस मंत्रिमंडळानें अजूनपर्यंत एकदांही निर्माण केला नाहीं एवढा बिकट पेंचप्रसंग मी तुझ्यापुढें उभा केला. हेतु हा कीं, स्वतःचा शाप खोटा ठरूं नये म्हणून तरी माझ्यावर चोरीचा आळ आणून, माझी तुरुंगांत रवानगी होण्याची तजवीज तूं करशील, आणि पर्यायानें माझ्यावर कोसळलेल्या विघ्नाचें हरण करशील ! माझ्या पाठीमागें लागलेली पोटाची विवंचना थोडे दिवस तरी सुटेल, आणि बेकार म्हणून माझ्याकडे बोट दाखवून हेटाळणीनें हंसणाऱ्या लोकांच्या दृष्टीआड थोडे दिवस तरी मला होतां येईल. पण नाहीं. मी अजून तुरुंगाच्या बाहेरच !

हीच का तुझ्या शापाची शोभा ?
जगांत तुझ्या आणि माझ्या शब्दाची किंमत सारखीच ठरली आहे.

हे ऋद्धिसिद्धींच्या प्रतिपालका !—

उगाच तूं या दोघींचा प्रतिपालक झालास ! त्यांच्यापैकीं एकही तुझा शाप खरा करून दाखवण्याच्या कामीं मला वश होत नाहीं, किंवा तुला सहाय्य करीत नाहीं. तुझ्या जन्मदिवशीं चंद्रदर्शन घेतलें असतांही कुणी माझ्यावर चोरीचा आळ घेईना. म्हणून शेवटीं खरीच चोरी केली. तुझ्या पुढ्यांतली मेवामिठाई आणि पैसे—सुपाऱ्या चोरल्या. तेवढ्यानें भागलें नाहीं, म्हणून शेवटीं एकाचा खिसा कापला. पण व्यर्थ ! प्रत्यक्ष चोरी करूनसुद्धां मला चोर म्हणून पकडून कुणी पोलिसाच्या ताब्यांत देईना !

हीच का तुझ्या शापाची शोभा ?
जगांत तुझ्या आणि माझ्या शब्दाची किंमत सारखीच ठरली आहे.

## चोरटे हल्ले

**हे वक्रतुंडा !—**

माझी कुचेष्टा करून तूं मला वेडावून तर दाखवीत नाहींस ? किंवा आपला शाप फोल असल्याचा प्रत्यय फार पूर्वीच आल्यामुळें तूं असा वांकडें तोंड करून बसला आहेस ? तुझ्या वक्रतुंड नांवाची अशीच उपपत्ति लावण्याचा प्रसंग आमच्यावर यावा काय ?

हीच का तुझ्या शापाची शोभा ?

जगांत तुझ्या आणि माझ्या शब्दाची किंमत सारखीच ठरली आहे.

**हे बुद्धिनायका !—**

कशाला स्वतःला बुद्धिनायक म्हणवितोस ? नाटकांतला नायक रंगभूमीवर मोठा रुबाब दाखवितो, पण कंपनीच्या बिऱ्हाडीं पिठलें-भातावरच निर्वाह करीत असतो, तसाच तूं बुद्धीचा नायक दिसतोस ! मला वेडावून दाखवण्यांत तूं स्वतःचीच विटंबना करून घेत आहेस, हें कसें तुझ्या ध्यानांत येत नाहीं ? तुझ्या शापाची विटंबना म्हणजे तुझीच विटंबना; ती तूं किलकिल्या डोळ्यांनीं पहात स्वस्थ बसणार काय ?

हीच का तुझ्या शापाची शोभा ?

जगांत तुझ्या आणि माझ्या शब्दाची किंमत सारखीच ठरली आहे.

**हे गणनायका !—**

तूं आम्हां बेकारांचा नायक मात्र खरोखरीच शोभशील !

सर्व उपाय हरले तेव्हां, ‘ मी चोर आहें, मला पकडा. ’ म्हणून मी होऊन पोलिसांच्या गळ्यांत जाऊन पडलों. पण पुराव्याशिवाय माझ्या शब्दावर विश्वास ठेवण्याचें त्यांनीं साफ नाकारलें ! ज्या जगांत तुझ्या शब्दाची किंमत राहिली नाहीं, त्या जगांत मजसारख्या बेकार पामराच्या शब्दाची काय किंमत ?

हीच का तुझ्या शापाची शोभा ?

जगांत तुझ्या आणि माझ्या शब्दाची किंमत सारखीच ठरली आहे !

---

## १२ : : नांवांत काय नाहीं ?

संपादक महाशय मोठ्या चिंतेंत पडले होते.

एका बड्या लेखकाला आपल्या मासिकाच्या खास दिवाळी–अंकासाठीं लेख लिहिण्याची विनंती त्यांनीं एक महिन्यापूर्वी केली होती. त्यानेंही लेख लौकरच पाठवून देतों असें आश्वासन दिलें होतें.

दिवाळीला फक्त आठच दिवस राहिले. खास अंकाच्या प्रसिद्धीलाही तेवढाच अवकाश होता. इतक्यांत लेखक महाशयांचें पत्र आलें:—

" अपरिहार्य अडचणीमुळें लेख पाठवितां येत नाहीं. अतिशय दिलगीर आहें. "

आतां काय करावें ?

खास अंकाची जाहिरात होऊन गेली होती. त्या बड्या लेखकाचा लेख खास अंकांत प्रसिद्ध होणार असें संपादकांनीं ठळक ठशांत जाहीर केलें होतें.

आणि आतां मोठाच दुर्धर प्रसंग आला होता. काय करावें, संपादक–महाशयांना सुचेना. त्यांनीं उपसंपादकाला हांक मारली, आणि या फजितीच्या प्रसंगीं काय करावें म्हणून त्याचा सल्ला विचारला.

तो छापखान्यांतील छावा क्षणभरच विचाराच्या आहारीं गेला. दुसऱ्या क्षणीं छातीवर हात मारून तो म्हणाला, " माझें काम. लेख उद्यां संध्याकाळीं तुमच्या हातांत पडला म्हणून समजा. "

× × × ×

आणि दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं खरोखरच त्यानें मुख्य संपादकांच्या हातांत एक लठ्ठसें पुडकें ठेवलें. त्याच उपसंपादकाचा सत्रा ठिकाणांहून साभार परत आलेला तो लेख होता ! त्यावर नांव मात्र संपादकांनीं जाहीर केलेल्या बड्या लेखकाचें होतें !

' पुढचें पुढें पहातां येईल. ' असा विचार करून अडल्या संपादकांनीं तो लेख जशाचा तसा छापून टाकला.

खास अंक प्रसिद्ध झाला.

आणि काय चमत्कार ? झाडून सगळ्या वृत्तपत्रांनीं त्या लेखावर अभिप्राय दिला होता,—

" इतका सुंदर लेख मराठी नियतकालिकांत क्वचितच प्रसिद्ध होतो. "

कित्येक वाचकांनीं व्यक्तिशः त्या बड्या लेखकाला पत्रें पाठवून त्याच्या लेखाची स्तुती केली होती.

तो बडा लेखक, आणि संपादक दोघेही आश्चर्यानें थक्क झाले होते !

पण उपसंपादकाला मात्र मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. तो मनांत म्हणत होता,—" खरंच तें. इतका सुंदर लेख मराठी नियतकालिकांत क्वचितच प्रसिद्ध होतो. कारण पुष्कळदां तो न वाचतांच साभार परत येत असतो ! "

---

# १३ : : अनपेक्षित लाभ

" ठणण ! "

क्लबांतील घड्याळांत एक ठोका पडला.

वकीलसाहब 'ब्रिज'च्या डावांत इतके रंगून गेले होते की, तो ठोका साडेबाराचा होता, एकचा होता, की दीडचा होता इकडे लक्ष द्यायला त्यांना फुरसत नव्हती.

" नोट्रम ! " हातांतल्या पानांकडे पहात ते बेहोषपणें ओरडले.

तोंच कोणी तरी धाडकन् दार लोटून घाबऱ्याघाबऱ्या आंत घुसला. क्लबांतील सगळ्या मंडळीच्या तंद्रीचा सत्यनाश झाला.

" व-कील-साहेब, अहो तुमच्या घरांत कोणी तरी चोर दरोडेखोर शिरला आहे. चला, धांवा,–पळा लौकर ! " नवागत इसम धापा टाकीत म्हणाला.

" खरं म्हणतोस ? " वकीलसाहेब बसल्या जागेवरून न हालतांच म्हणाले.

" खरं म्हणजे काय ? मी माझ्या डोळ्यांनी पाह्यलं प्रत्यक्ष ! चला लौकर. उठा–उठा. "

तरीही वकीलसाहेब थंडच !

इतकेंच नव्हे, तर कसलें तरी गंमतीचें दृश्य डोळयांपुढून सरकत असावें तशा त्यांना गुदगुल्या होत असलेल्या दिसल्या. खेदाचें उसनें अवसान आणून, मान हालवून एक सुस्कारा टाकून ते म्हणाले,—

" अरेरे, गरीब बिचारा! मला त्याची कींव येते. "

क्लबांतील त्यांच्या दोस्तांना मोठें आश्चर्य वाटलें. वकीलसाहेबांच्या या विचित्र वागणुकीचा त्यांना अर्थच कळेना. शेवटीं त्यातल्या एकानें विचारलेंच,—

" अहो, तुमची बायको घरीं एकटीच आहे ना? "

" मग? " वकीलसाहेब मोठमोठ्यानें हंसत म्हणाले, " अहो, तीच तर गंमत आहे. उशीरां घरीं परत आलेला मीच तो, असं समजून 'ती' त्या चोराला चांगलाच बडवून काढील! बिचाऱ्याचं कर्म ओढवलं खरं. मला त्याच्या हालांची कल्पनाच करवत नाहीं! "

---

# १४ :: तोतया संपादकाची दिवाळी !

" हॅलॉव्....'मध्यान्ह' ऑफिस का ?-"

" हं, ....' मध्यान्ह ' ऑफिस. "

" हं, .... मी बुडबुडे ऑईल अँड सोप कंपनीचा मॅनेजर बोलतों आहे. तुम्ही कोण ? "

" मी 'मध्यान्ह' ऑफिसचा मॅनेजर..... कोण पाहिजे तुम्हाला ? "

" एडिटर आहेत का ? "

" अहो एडिटर काय एक का आहे आमच्याकडे ? नांव सांगा ना कोण पाहिजे त्याचें. "

" बन्याबापू लटपटे आहेत का ? "

" होय !...लटपटे आहे एक आमच्याकडे. पण तो एडिटर नाहीं ! "

" खरं कीं काय ? "

" म्हणजे ! तुम्हाला कुणी सांगितलं लटपटे एडिटर आहे म्हणून ? अहो बन्याबापू आमच्याकडे प्रूफकरेक्टर म्हणून आहे. "

"...भले ! बरं तो आहे का तिथें ? असला तर बोलवा जरा त्याला फोनवर."

"थांबा हं जरा."

'मध्यान्ह' ऑफिसच्या मॅनेजरनीं शेजारच्या खोलींत बसलेल्या बन्याबापूंना बसल्या जागेवरूनच हांक मारली.

पुड्यांतल्या प्रुफांवर पेपरवेटच्या अभावीं आपली विड्यांची डबी ठेवून बन्याबापू लगबगीनें मॅनेजरच्या खोलींत गेले.

टेलिफोनचा रिसीव्हर उचलून त्यांनीं कानाला लावला. "हं, मी बन्याबापू लटपटे. कोण आहे ?......हं हं, समजलों··समजलों......हं हं, पाठविली होती........पोंचली पण होती.......हं...पऽण....छे छे,....त्यांचा किंवा तुमचा गैरसमज झाला असेल कांहींतरी...अभिप्राय ना ?....उद्यां जरूर. पण माझ्या हातीं पेटी पडलेली नाहीं....बघा, तुमची मर्जी असली तर पाठवून द्या, आणखी....पण तसं कशाला ? फोनवर किती बोलणार हो ! तुमचा मनुष्य पाठवून द्या ना इकडे एक तासभरानं. म्हणजे समक्ष खुलासा करायला बरं पडेल... अच्छा. मी वाट पहातों हं."

बन्याबापूंनीं रिसीव्हर खालीं ठेविला. चोरून दूध पितांना बोका जसा मधून मधून दबकत आजूबाजूला बघत असतो, तसे बन्याबापू टेलिफोनवर बोलत असतांना मधून मधून हळूच मॅनेजरांकडे नजर फेंकीत होते. त्यांचा चेहरा गोरामोरा झाला होता. मॅनेजरांच्या खोलींतून बाहेर पडण्यापूर्वी त्यांनीं पुनः एकदां टेलिफोनजवळच्या खुर्चीवर बसलेल्या मॅनेजरांकडे चोरून नजर फेंकली.

पण आपल्या टेबलाजवळ येऊन बसल्यावर, कुत्र्याच्या तावडींतून सुटलेल्या मांजरासारखी त्यांच्या चेहऱ्यावर पुन्हा हुशारी आली. ते पूर्वीपेक्षां अधिक तडफेनें प्रुफांवर तुटून पडले. शोधक नजरेनें कोंवडी जशी उकिरड्यांतले दाणे टिपते तसे बन्याबापू प्रुफांतल्या चुका हुडकून काढण्यांत अगदीं गढून गेले. न्हाव्याच्या धोकटींत जशी वस्तऱ्यांची गर्दी झालेली असते, तशी बन्याबापूंच्या ठोकळ्यांत अनेक जाड--बारीक टांकांची गर्दी झाली होती. पण त्यांतून

निवड करण्याच्या मनःस्थितींत ते यावेळीं नव्हते. टेबलाच्या फटींतून हातांचे वरच्यावर चावे घेणाऱ्या ढेकणांनासुद्धां दाद न देतां ते पुढ्यांतल्या प्रुफांचा फडशा पाडीत होते.

अर्ध्या तासाच्या आंत त्यांनीं सगळीं प्रुफें वाचून टाकलीं. टेबलाचा खण उघडून तीं सगळीं त्यानीं घाईघाईनें त्यांत कोंबलीं. प्रुफांबरोबर आलेल्या हस्तलिखितांच्या चिंधड्या करून त्या त्यांनीं टेबलाखालच्या कचऱ्याच्या टोपलींत टाकल्या, इतकेंच नव्ह तर टापलीच्या तळाशीं गाडून टाकल्या.

नंतर एकदां आजूबाजूला नजर फेंकून, त्यांनीं हळूच संपादकांच्या खुर्चीत बैठक मारली. बढतीसाठीं चडपडणारा कारकून, जसा वरच्या ग्रेडच्या कारकुनानें आपल्या नोकरीचा किंवा इहलोकाचा निरोप घेण्याची वाट पहात टपून बसतो, तसे बन्याबापू संपादकवर्ग ऑफिसच्या बाहेर पडण्याची वाट पहात टपूनच बसले होते.

टेलिफोनवरून त्यांनीं थोड्या वेळापूर्वी जी ' अपॉइंटमेंट ' ठरविली होती, तिची ही पूर्वतयारी होती. पण प्रुफें तपासतांना टांकांच्या टोकाशीं मध्येंच शाईचा बोळा यावा, त्याप्रमाणें मध्येंच एक लहानसें विघ्न बन्याबापूंचा बेत पार पडण्यापूर्वी उपस्थित झालें. मॅनेजरसाहेबांची स्वारी बन्याबापूंपुढें अचानक दत्त म्हणून उभी राहिली.

"काय बन्याबापू, काय विचार आहे आज ? अहो खुर्च्या बदलून कुणी प्रुफकरेक्टरचा संपादक होता काय !" मॅनेजरसाहेबांनीं पेटती विडी तोंडांतल्या तोंडांत चाळवीत विचारलें. वास्तविक ते दमच भरायच. पण त्यांच्या थट्टेच्या स्वरामुळें बन्याबापूंच्या जिवांत जीव आला. धीर करून ते म्हणाले–, " अंऽऽहं, तसं नव्हे. या खुर्चीत मनस्वी ढेकूण झाले आहेत. तेव्हां म्हटलं जरा स्थलांतर करून पहावं. "

बन्याबापूंच्या या समयसूचकतेनें खुद्द बिरबल तिथें असता तरी तो गार झाला असता ! मग मॅनेजरसाहेबांची काय कथा ? त्यांनीं पाठ फिरवलेली पहातांच स्वतःच्या विलक्षण बुद्धिमत्तेवर खूष झालेल्या बन्याबापूंनीं फोरमनला

( कंपॉझिटरांचा मुक़ादम ) हांक मारली. तो हजर होतांच त्याची चंची मागून घेऊन त्यांनीं एक भरभक्कम बार मारला, आणि चंची परत देऊन ते जरा स्वस्थ करीत बसले. त्यांना फार वेळ वाट पहात बसावें लागलें नाहीं.

थोड्याच वेळांत मॅनेजरसाहेबांच्या खोलींत कोणी तरी आपली चौकशी करीत असल्याचें त्यांच्या कानीं आलें. झटकन् त्यांनीं टेबलावरचें एक लठ्ठसें परदेशी वर्तमानपत्र उघडून तोंडापुढें धरलें. तेवढ्यांत आपल्या टेबलापुढें कोणीतरी येऊन उभें राहिल्याचें त्यांच्या नजरेंतून सुटलें नाहीं. आलेल्या इसमावर छाप पाडण्यासाठीं आणखी पांच मिनिटें वाचनांत गढून गेल्याचा आव आणण्याचा त्यांचा विचार होता. पण हातांतलें वर्तमानपत्र आपण उलटें धरलें असल्याचें ध्यानांत येतांच ओशाळे होऊन त्यांनीं तें मोठ्या शिताफीनें झटकन् टेबलावर फेंकून दिलें. आपली ही गफलत समोरच्या इसमाच्या ध्यानांत आली कीं काय म्हणून ते जरा चपापले; पण समोरचा इसम फारसा सुशिक्षित नसावा असें त्याच्याकडे नजर फेंकतांच त्यांच्या ध्यानांत आलें. खिडकीकडे जाऊन तोंडांतल्या बाराची एक भली मोठी पिचकारी बाहेर सोडून ते परत खुर्चीवर येऊन बसले. नंतर आलेल्या इसमाला आपण जणूं काय आतांच पाहिलें अशा आविर्भावानें ते म्हणाले,—" हं, काय काम आहे तुमचं ? "

" ही चिठ्ठी दिली आहे शेटनीं. आणि ही एक पेटी. "

" कोण शेट ? आणि कसली पेटी ? "

" त्यें समदं चिठींत हाय. "

" बघूं , " बन्याबापूंनीं आपली मुद्रा शक्य तितकी निर्विकार ठेवण्याचा प्रयत्न केला. पण मनांतून त्यांना आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या. ती पेटी " बुडबुडे ऑईल ॲण्ड सोप कंपनी "कडूनच आली आहे, हें बन्याबापूंनीं केव्हांच ओळखलें होतें, आणि तिच्यांत साबणाच्या वड्या असल्या पाहिजेत याबद्दलही त्यांना शंका नव्हती. पण मनांतून झालेला परमहर्ष चेहऱ्यावर दाखवणें आशाळभूतपणाचें दिसलें असतें हें ओळखून, मन शक्य तितकें स्वस्थ करून, त्यांनीं घाईघाईनें चिठ्ठीवर नजर टाकली. तींत पुढीलप्रमाणें मजकूर होता:—

## तोतया संपादकाची दिवाळी !

बुडबुडे ऑईल अँड सोप कंपनी,
× × × रोड, मुंबई.
ता. × × ×

श्री. बन्याबापू लटपटे,

संपादक, " मध्यान्ह " यांस, सा. न. वि. वि.—

" तुमच्याकडे ' बॉस्को ' साबणाच्या दोन पेट्या अभिप्रायार्थ पाठविल्या, त्याला आज आठ दिवस होत आले. उद्यां नरक–चतुर्दशी,–दिवाळीचा पहिला दिवस. तुमचा अभिप्राय येणार तरी केव्हां ? तुम्हांला जाहिरात दिली, दोन पेट्या पाठविल्या. दिवाळीच्या आंत अभिप्राय देतों म्हणून म्हणालांत; आणि अजून त्याचा कुठें पत्ता नाहीं. आतां आमचें दिवाळें निघायच्या आंत तरी अभिप्राय द्या. मागच्या दोन पेट्या तुमच्या हातीं पडल्या नसतील म्हणून आज खास उंची ' बॉस्को ' ची तिसरी पेटी नमुन्यादाखल पाठवीत आहें. आतां तरी ताबडतोब अभिप्राय येईल काय ?

आपले विश्वस्त,—
बुडबुडे ऑईल अॅण्ड सोप कं.

बन्याबापूंनीं त्याच चिठ्ठीच्या पाठीवर लिहिलें—

" आपण पाठवलेल्या पहिल्या पेट्या पोंचल्या. परंतु माझ्या ऑफिसांतील सहकाऱ्यांनीं त्या लांबविल्या. प्रतिष्ठित लोकांतसुद्धां असली लफंगगिरीची प्रवृत्ती आढळते ही खेदाची गोष्ट आहे. संपादक पुस्तकें वाचल्याशिवाय अभिप्राय देतात अशी ओरड त्यांच्याविरुद्ध सर्रास चालू आहे. अशा परिस्थितींत आणखी साबण वापरून पाहिल्याशिवाय अभिप्राय देण्याचा आरोप संपादकांच्या माथीं यायला नको. म्हणूनच अजूनपर्यंत अभिप्राय दिला नाहीं. आपण आज पाठविलेली पेटी वापरून पाहून उद्यां ताबडतोब अभिप्राय प्रसिद्ध होण्याची तजवीज करतों.

आपला,—
**लटपटे,**
संपादक, ' मध्यान्ह.'

ही चिठ्ठी आलेल्या इसमाच्या हवालीं करून बन्याबापूंनीं त्याची रवानगी करून दिली. त्या पेटींतील साबण एकवार डोळ्यांनीं पहाण्याची इच्छा त्यांना आंवरतां यईना. त्यांनीं पेटी उघडली. आंत तीन लहान वड्या दिसल्या. " अरे, या सँपलच्या वड्या दिसतात! ठीक आहे, अभिप्राय पण तसाच देतों बच्यंजी !" असें पुटपुटून घाईघाईनें ती साबणाची पेटी टेबलावर पडलेल्या नव्याजुन्या वर्तमानपत्रांत गुंडाळून, आणि तें भेंडोळें कांखोटीस मारून ते तडक घरीं निघून गेले.

बन्याबापू आज अगदीं खुशींत होते. जिना चढून आपल्या पहिल्या मजल्यावरच्या खालींत पाऊल टाकतांच त्यांनीं दरवाज्यांतून हांक मारली, " अग एऽ, आज काय आणलंय् पाह्यलंस का ? "

स्वैंपाकघरांत—किंवा खालींत म्हणणें जास्त बरोबर होईल—,जेवण करण्यांत गढून गेलेल्या सौ. लटपटे हातांतलें काम टाकून लगबगीनें बाहेर आल्या.

" इश्श, वर्तमानपत्रांचा भारा दिसतोय् नुसता ! मला काय करायचा तो. घरांत पोरंबाळं असतीं तर एक गोष्ट वगळी. "

" अग वर्तमानपत्रं हेंच आमचं वैभव. वर्तमानपत्रं आहेत म्हणून आम्ही आहोंत,आणि वर्तमानपत्रं आहेत म्हणून ही साबणाची पेटी माझ्या कांखेंत आहे."

" म्हणजे ? परवां ना दोन पेट्या आणल्या ? आणि आज पुन्हां तिसरी कीं काय ? बरं आहे बाई. पगार नाहीं वेळेवर मिळाला तरी एवढा तरी एक फायदा असतो. "

बन्याबापूंनीं एरवीं यावर काय उत्तर दिलें असतें,तें सांगणें कठीण आहे. पण आज ते अगदीं खुषींत होते.

" अग पगाराचं काय घेऊन बसलीस. संपादक म्हणजे काय चीज असते ठाऊक नाहीं तुला. सरकारलासुद्धां संपादकाची भीती वाटते मग इतरांची काय कथा ? उगाच नाहीं लोक आमच्याकडे साबणाच्या पेट्या पोंचत्या करीत ! एकं शब्द विरुद्ध लिहिला तर सबंध कारखाना जमीनदोस्त होईल! म्हणजे काय—कुणी

विचारायचं नाहीं यांच्या साबणांना. आणि मग कारखाना आपोआप बसणारच ! असें आहे आमचं संपादकाचें सामर्थ्य ! आहे माहीत ? ”

“ अगबाई, दूध उताला गेलं वाटतं ! मेलं लक्षांतच नाहीं माझ्या...” सौ. लटपटे धांवतच स्वैंपाकघरांत गेल्या. आणि एकुलता एक श्रोता पळून गेल्यामुळें श्रीयुत लटपटे यांना ‘ संपादकांचें सामर्थ्य ’ या विषयावरील आपलें व्याख्यान आटोपतें घ्यावें लागलें.

आदल्या दिवशीं लाटलेल्या ‘बॉल्को’ साबणाच्या पेटींतील एक वडी हातांत घेऊन दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे बन्याबापू मोठ्या उत्साहानें स्नानगृहांत शिरले.

पण पांच दहा मिनिटांच्या आंतच ते स्नानगृहांतून घाबऱ्याघुबऱ्या बाहेर पडले, आणि तडक स्वैंपाकघरांत पळत गेले.

सौ. लटपटे त्यांच्याकडे पहातच राहिल्या. “ म्हणजे ? सलूनमध्यें केव्हां जायचं होतं ? आंघोळीला जायचं होतं ना बाथरूममध्यें. आणि असं घाबरायला काय झालं ? ”

बन्याबापूंच्या नाकाडोळयांतून सारखें पाणी वहात होतें. त्यांनीं आपले ओंठ गच्च दाबून धरले होते. मोठ्या कष्टानें त्यांच्या तोंडून शब्द बाहेर पडले,—

“ ती लहान वडी बघितल्यावर मला शंका आलीच होती. पण म्हटलं नमुन्याच्या वड्या एवढ्याच असायच्या. ठार फशिवलन् लेकाच्यानं. बादशाही साबण होता तो ! बरं तर बरं, माझ्या आधीं तूं अंग धुतलं नाहीस. नाहीं तर काय,... बघायलाच नको होतं.... आम्ही ह्यात असतांनाच...”

“ इश्श, तुमच्या जिभेला कांहीं हाड ? ” सौ. लटपटे दोन्ही हातांच्या मुठी पुढें नाचवीत म्हणाल्या.

बिचारे बन्याबापू आपल्या गुळगुळीत डोक्यावरून हात फिरवीत स्वतःशीं आश्चर्य करीत राहिले !

कारण बन्याबापूंनीं वापरलेला साबण म्हणजे बादशाही साबण होता ! बुडबुडे ऑईल अँड सोप कंपनीच्या मॅनेजरनें त्यांचा चांगलाच सूड उगवला होता.

दुपारीं बन्याबापू मोठ्या नाइलाजानें ऑफिसांत गेले. ते ऑफिसांत पाऊल टाकतात तोंच मॅनेजरनीं खूप मोठ्यानें हंसून त्यांना आपल्या खोलींत हांक मारली.

" काय बन्याबापू, ढेंकणांच्या बंदोबस्तासाठीं तुम्ही खुर्ची बदललीत, आतां उवांच्या बंदोबस्तासाठीं बादशाही साबण वापरलात कीं काय ? किं पर्वणि मुंडणम् ? "

या प्रश्नाचें उत्तर देण्यास कालिदासच कदाचित् समर्थ ठरला असता. बन्याबापूंची बिरबलाची भूमिका यशस्वी ठरली होती. पण कालिदासाची भूमिका वठविण्यांत त्यांना निखालस अपयश आलें !

---

## १५ : : दोन भिकारी !

इतके दिवस सतत छत्रीचें ओझें बरोबर वाळगीत आल्याचें सार्थक झालें, असेंच त्याला वाटलें. ज्या संधीची तो चातकासारखी वाट पहात होता ती आली एकदांची !

पण चातकाप्रमाणें तो केवळ पावसाचीच वाट पहात नव्हता. पावसाबरो-बरच, छत्रीवांचून त्याच्या तडाख्यांत सांपडून भिजणाऱ्या तरुणीच्या शोधांत होता तो ! आज तसा दुर्मिळ योग घडून आला.

एकाएकीं पावसाचे मोठाले थेंब पडूं लागले. आणि 'ती' भिजण्याच्या भीतीनें भराभर पावलें उचलूं लागली. छऱ्या हातांत असलेले आजूबाजूचे कित्येक तरुण झपाट्यानें तिच्या रोखानें पुढें सरसावले, आणि ज्यांच्या हातांत छऱ्या नव्हत्या ते हळहळत नुसते बघत राहिले.

तोही तिच्याशीं लगट करण्याच्या ईर्षेनें पुढें सरसावला.

त्यानें सर्वांच्या आधीं तिला गांठलें. आणि अंमळ घुटमळत तो म्हणाला,– " कुठे जायचं तुम्हाला ? या कीं माझ्या छत्रींत,–बरोबरच जाऊं आपण ! "

तिनें त्याला एकदां आपादमस्तक न्याहाळून पाहिलें, आणि किंचित् हंसून ती म्हणाली, " माझी नको काळजी तुम्हांला. या नजीकच्याच गल्लींत

घर आहे माझं. पण तो त्या फूटपाथवर भिकारी पाहिलात ? मला त्याची दया येते. त्याला घ्या ना छत्रींत ! शिवाय तो बरा जोडीदार शोभेल तुम्हाला ! ”

त्यानें साशंक मुद्रेनें पायांपासून छातीपर्यंत आपल्या रुबाबदार कपड्यांवरून नजर फिरविली एकदां.

“ कपडयांचं नव्हे म्हणत मी. ” ती पुनः हंसून म्हणाली, “ चेहऱ्या-शिवाय बाकी सगळा रुबाब ठिक्क आहे अगदीं. पण त्या भिकाऱ्याच्या आणि तुमच्या चेहऱ्यावर कशी अगदीं एक छटा दिसते,–आशाळभूतपणाची ! म्हणून म्हटलं मी ! घ्या ना त्याला छत्रींत ! ”

त्याला मस्तकावर वीज कोसळल्यासारखें वाटलें. पण ती अशी न कोसळतां रीतसर आभाळांतूनच कोसळली असती तर तें अधिक परवडलं असतं त्याला !

---

## १६ : : हेडमास्तर याने न्हावी !

हेडमास्तर आणि न्हावी हे शब्द भावी काळांत समानार्थक समजले जाण्याचीं चिन्हें दिसतात !

केवळ शब्दार्थाच्या दृष्टीनें विचार केला तर हेडमास्तर म्हणजे न्हावी असा अर्थ घेण्यास फारशी अडचण दिसत नाहीं. हेडमास्तर ( Head – Master ) शब्दाचा अर्थ 'डोक्याचा मालक' असा होऊं शकतोच ! आणि 'डोक्याचा मालक' म्हणवून घेण्यास न्हाव्या-इतका सत्पात्र इसम दुसरा कोण आहे ? आपलें डोकें आपण वरच्यावर त्याच्याच स्वाधीन करीत नसतों काय ? तेव्हां हेडमास्तर म्हणजे न्हावी असा अर्थ केल्यास तो यथार्थ ठरेल याबद्दल शंका नाहीं.

कित्येक हेडमास्तरांना माझें हें म्हणणें 'गैरशिस्त' वाटेल. पण त्यांनीं आणखी एक गोष्ट ध्यानांत घ्यावी. मुलांच्या नीतिमत्तेचें संरक्षण आणि संवर्धन करण्याच्या कामीं शिक्षकाप्रमाणेंच न्हावीसुद्धां यथाशक्ति हातभार लावीत असतो, ही गोष्ट नुकतीच एका हेडमास्तरानेंच स्वतःच्या उक्तीनें आणि कृतीनें सिद्ध केली आहे.

## चोरटे हल्ले

थोड्या दिवसांपूर्वी बालाघाट येथील सरकारी हायस्कूलच्या हेडमास्तरानें, आपल्या हायस्कुलांतील एका विद्यार्थ्याची स्वतःच्या हातानें हजामत केली; आणि इतर मुलांची आपल्या देखरेखीखालीं करवून घेतली. कां? तर म्हणे केस राखण्याची फॅशन केल्यामुळें मुलें बहकतात. त्यांची नीति बिघडते! आणि हजामत केल्यानें ती ताळ्यावर रहाते!

या अपूर्व संशोधनामुळें जेथें जेथें म्हणून न्हावी आहेत, तेथें तेथें आणखी कांहीं वर्षांनीं पोलिसखात्याचें अजिबात उच्चाटन झाल्याचा अद्भुत देखावा दृष्टीस पडण्याचा संभव आहे! कारण झाडून सगळ्या मुलांची लहानपणापासून हजामत करीत राहिल्यास त्यांची नीति बिघडण्याचा सुतराम् संभव नाहीं. आणि अशा प्रकारें अनीतीचें समूळ उच्चाटन झाल्यावर पोलिसांची काय जरूरी राहिली?

मशारनिल्हे हेडमास्तराच्या अजब शोधापासून पाश्चात्त्य शिक्षणतज्ञांना पुष्कळच बोध घेतां येण्यासारखा आहे. मुलांना नीतिशिक्षण देण्याच्या प्रश्नाचा ते मोठा बाऊ करीत असतात. पैसा, शक्ति आणि वेळ यांचा अपव्यय करून मुलांना नीतिशिक्षण देण्याबाबत ते जे नाना प्रयोग करीत असतात ते अयशस्वी कां होतात याचा आतां त्यांना उलगडा होईल! मुलांची हजामत करण्यावर ते कटाक्ष ठेवीत नाहींत, हेंच त्यांच्या अपयशाचें कारण असलें पाहिजे!

मशारनिल्हे हेडमास्तरानें मुलांच्या डोक्यांवर केलेला प्रयोग, वर्धा शिक्षण-योजनेच्या पुरस्कर्त्यांनींही अवश्य करून पहाण्यासारखा आहे. कारण मुलांना नीतिशिक्षणाबरोबरच जातां जातां धंदेशिक्षणही मिळण्याची खाशी सोय या प्रयोगानें होणार आहे. आणि वर्धा शिक्षणयोजनेनें मुलांना जे धंदे शिकविण्याचें ठरविलें आहे, त्यापेक्षां हजामतीचा धंदा किती तरी बरा म्हणावा लागेल! हजामतीच्या धंद्यांत पडलेला माणूस कधीं उपाशीं मरायचा नाहीं!

मशारनिल्हे हेडमास्तराची विचारसरणी मान्य केल्यास आणखी दोन महत्वाच्या प्रश्नांवर नवा प्रकाश पाडण्यासारखा आहे. पाश्चात्त्य देशांत गुन्ह्यांचें प्रमाण जास्त कां, आणि बंगालमध्यें माथेफिरू क्रांतिकारक जास्त प्रमाणांत कां निपजतात, या दोन्ही प्रश्नांचा आतां चुटकीसरशी निकाल लावतां येईल. तेथील

लोकांत केंस वाढविण्याची जी दुष्ट फॅशन बोकाळली आहे त्याचाच हा परिणाम होय !

पण हजामत केल्यानें सर्व मुलें किंवा मोठीं माणसें सच्छील बनतात असा नियम बांधण्यास एक मोठीच अडचण आहे. तसें असतें तर दर आठवड्यास नियमितपणें हजामत करणारे झाडून सगळे भिक्षुक, संस्कृतिसंरक्षक, सनातनी, आणि बापाच्या भयानें न्हाव्यापुढें निमूटपणें मान वांकविणारे त्यांचे चिरंजीव म्हणजे नीतीचे पुतळे असायला पाहिजे होते. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. दक्षिणेचा पैसा दोनदां उपटण्यापासून तों इस्टेटीसाठीं भाऊबंदांचे गळे कापण्यापर्यंत सर्व लहानमोठे गुन्हे, हजामत करणाऱ्या लहानथोरांकडून केले जातात, हें हजामत करूनही नीतिभ्रष्ट झालेले नाहींत असे सनातनी तरी निदान कबूल करतील.

हजामत केल्यानंतरही माणूस बहकल्यासारखा वागणें शक्य असतें, हें सिद्ध करणें तर अगदींच सोपें आहे. ज्या मशारनिल्हे हेडमास्तराचा मुलांच्या हजामतीवर विशेष कटाक्ष आहे, तो स्वतः हजामत करीत असलाच पाहिजे यांत शंका नाहीं. पण हाताखालच्या मुलांची स्वतःच्या हातानें हजामत करण्याइतका जो त्याचा अधःपात झाला तो काय त्याचें डोकें बहकलेलें असल्याखेरीज ?

मुलाचं डोकें वरून गुळगुळीत केलें तरी त्याच्या डोक्याच्या आंतील नीतिविषयक कल्पनांत त्यामुळें कांहींच बदल होत नाहीं, इतकी साधी गोष्ट ज्या हेडमास्तराच्या लक्षांत आली नाहीं, त्याचें डोकें ठिकाणावर आहे असें म्हणण्यास कोण धजेल ?

माझ्या डोक्यावर खूप केंस आहेत. याचा फायदा घेऊन उद्यां जर कोणी मला म्हणाला कीं, ' बाबा रे, तूं हजामत करीत नाहींस, म्हणून असें बहकल्यासारखें लिहितोस. ' तर मला तें पटेल काय ?

नाहीं. मी बहकल्यासारखें लिहूं नये म्हणून त्यानें माझी कितीही ' हजामत ' केली, तरी माझ्या विचारसरणींत त्यामुळें कांहीं एक बदल होणार नाहीं. त्या हजामतीनंतरही मी असेंच लिहीन.

आणि इतक्याही उपर माझी हजामत करण्याचा कोणी हट्टाग्रह धरूं लागला, तर त्याला हजाम म्हणायचें आणि सोडून द्यायचें ! दुसरें काय !

× × × ×

हंगेरीमधील देशभक्त नियमितपणें हजामत करून घेतात कीं नाहीं तें मला माहीत नाहीं. पण त्यांचींसुद्धां डोकीं बहकलेलीं दिसतात !

' हंगेरीमधील लोकांनीं देशाभिमान व्यक्त करण्यासाठीं भरदार मिशा राखाव्यात. ' अशा आशयाचें एक विक्षिप्तपणाचें पत्रक हंगेरीच्या देशभक्तांनीं नुकतेंच काढलें आहे.

देशाभिमानाचें सगळें रहस्य भरदार मिशांत सांठविलेलें आहे, हें वाचून आमच्या भटाभिक्षुकांची आणि संस्कृति-संरक्षकांची छाती अभिमानानें फुगून जाऊन तिचा घेर त्यांच्या पोटापेक्षां मोठा होईल, आणि त्यांच्या बाराबंदीचे बंद पटापट तुटून जातील. ' हिंदुस्थानांत देशाभिमानाचे अंकुर मिशांच्या रूपानें आमच्याच ओंठावर काय ते फोंफावत आहेत ! ' म्हणून ते पळीपंचपात्रींच्या खडखडाटाच्या तालावर नाचूं लागतील !

पण १९३० सालीं ज्यावेळीं सबंध देशांत कायदेभंगाची लाट उसळली होती, आणि लाखों तरुण स्त्री–पुरुष पोलिसांच्या निर्दय लाठीहल्ल्यांना तोंड देत होते, त्या अत्यंत प्रक्षोभक काळांतसुद्धां आमचे भटभिक्षुक आणि संस्कृतिसंरक्षक बुंदीच्या लाडवांना तोंड देण्यांतच आयुष्याचें सार्थक मानीत होते ! जिलबी हें परदेशी पक्वान्न आहे, म्हणून त्याच्यावर बहिष्कार घालणाऱ्या पुण्याच्या दत्तोपंत पोतदारांइतका देशाभिमान त्यांनीं दाखविला असता तरी त्यांना किंचित् देशभक्त म्हणण्यास हरकत नव्हती. पण देशाभिमानास्तव ज्यांना जिलबीचाही त्याग करवत नाहीं, ते केवळ मिशा राखतात म्हणून त्यांना देशाभिमानी म्हणण्याऐवजीं नुसतें मिशाभिमानीच म्हणणें योग्य ठरेल !

देशाभिमानाच्या पिळाचा मिशांच्या पिळाशीं कांहीं एक संबंध नाहीं, हें सिद्ध करण्यासाठीं या सगळ्या मिशाभिमान्यांना एकच सवाल विचारला तरी पुरेसा होईल. ओंठावर मिशांचें जंजाळ राखल्यानें माणसाच्या अंतःकरणांत

देशभक्तीचे नंदादीप पाजळत रहात असते, तर मराठेशाही धुळीला मिळण्याचें काय कारण होतें ?

× × × ×

हंगेरियन देशभक्तांच्या पत्रकाचा एरवीं कितपत परिणाम झाला असता कुणास ठाऊक ? पण नुकत्याच घडून आलेल्या एका चमत्कारिक घटनेमुळें हंगेरींत मिशा राखण्याची सांथ फैलावण्याचा बराच संभव दिसतो !

थोड्या दिवसांपूर्वी एका हंगेरियन स्त्रीनें एका तरुणाला चुंबन देण्याचें नाकारलें. कारण काय ? तर त्यानें मिशा काढल्या होत्या ! या विलक्षण प्रकारानंतर हंगेरींतल्या लोकांना मिशांबद्दल भयंकर आस्था वाटूं लागली असली तर नवल कसलें ?

मात्र या तरुणीला आपल्या कृत्याचा फार लौकर पश्चात्ताप झाला असला पाहिजे. आणि आतां मिशा काढलेल्या एकाच काय पण सात तरुणांनासुद्धां चुंबनें देण्याची तिच्या मनाची तयारी झाली असेल.

कारण हंगेरियन कवींमध्यें, या देशभक्त तरुणीच्या प्रशंसापर कविता लिहिण्याची मोठीच चुरस लागली आहे ! आपल्यावर कविता लिहिणाऱ्या या कवींच्या तोंडाला तोंड देत बसण्यापेक्षां, त्यांच्या कवितांची बेसुमार निपज बंद पाडण्यासाठीं, पुन्हां संधि मिळाली तर मिशा काढणाऱ्या एखाद्या देशद्रोह्याच्या तोंडाला तोंड देऊन स्वतः देशद्रोही बनण्याचाच मार्ग ती आनंदानें स्वीकारील याबद्दल मला तरी शंका नाहीं.

या तरुणीवर कवींनीं रचलेल्या कवितांचा, लोकांत मिशा राखण्याची प्रवृत्ति उत्पन्न करण्याकरतां खूप प्रसार केला जात आहे. पण हंगेरियन लोकांत मिशा राखण्याचें प्रमाण वाढत असलें तर तें एखाद्या तरुणीकडून चुंबनाला नकार मिळेल या भीतीनेंच होय, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. देशभक्तीच्या भावनेमुळें किंवा कवींच्या कवितांचा परिणाम झाल्यामुळें मिशा वाढवण्याइतके बावळट लोक हंगेरींतच काय पण सबंध पृथ्वीच्या पाठीवर सुद्धां विरळाच !

वेडे बिचारे कवि ! ' लोक मिशा राखूं लागले हा आपल्या कवितांचाच परिणाम होय, ' अशा समजुतीनें त्यांना हर्षाच्या उकळ्या फुटत असतील ! Ignorance is bliss ! म्हणून मीहि पोटभर हंसतों झालं !

---

## १७ : : तीन भिकारी !

हिंदुस्थानांतील भिकाऱ्यांची संख्या पुढाऱ्यांसारखीच दिवसेंदिवस बेसुमार फुगत चालली आहे. पुढाऱ्याना भिकाऱ्यांच्या पंक्तीला बसविल्याबद्दल, पुढेंमागें पुढारीपणाचा धंदा करूं इच्छिणाऱ्या कित्येक लोकांचा माझ्यावर घुस्सा होईल. पण तसें पाहिलें तर पुढारी आणि भिकारी यांच्यामध्यें माझ्या मतें फारसा फरक नाहीं. अर्थात् कांहीं थोड्या तत्वनिष्ठ आणि स्वार्थत्यागी पुढाऱ्यांना या तुलनेंतून वगळावें लागेल. पण इतर पुढाऱ्यांबद्दल बोलायचें तर त्यांचें आणि भिकाऱ्यांचें तत्व एकच,—उदरंभरणाचें—असतें. जो काय फरक असेल तो तपशिलांत.

भिकारी आणि पुढारी या दोघांचा मुख्य धंदा एकच,—भीक मागण्याचा. फरक इतकाच कीं एक धर्माच्या नांवाखालीं भीक मागतो, तर दुसरा देशाच्या नांवाखालीं. तरीही एकाचा धंदा समाजांत तिरस्करणीय समजला जातो, आणि दुसऱ्याचा प्रतिष्ठित समजला जातो. धर्माच्या नांवाखालीं लोकांना लुबाडून एक जो पैसा गोळा करतो त्याला 'भीक' हा तुच्छतादर्शक शब्द वापरला जातो; आणि देशाच्या नांवाखालीं दुसरा जो पैसा गोळा करतो, त्याला ' फंड ' असें प्रतिष्ठित नांव आहे.

याप्रमाणें भिकारी आणि पुढारी यांचा पोट भरण्याचा धंदा तत्वतः जरी एक असला, तरी या दोघांच्या कार्यपद्धतींत,–म्हणजे भीक मागण्याच्या पद्धतींत, त्यांच्या दर्जाला अनुसरून फरक असतो. भिकारी, जो काय पै-पैसा लोकांकडून मिळेल तेवढ्यावर खूष असतो. पण पुढारी घाऊक रकमांखेरीज बात काढीत नाहीं ! भिकाऱ्याला पैसा किंवा मूठभर तांदूळ देऊन वाटेस लावण्यापूर्वी, त्याला मनसोक्त शिव्या हांसडण्याची आपल्याला मुभा असते, त्यांतही एक प्रकारचें समाधान असतें. पण पुढाऱ्यांना मात्र मुठीनें पैसे दिल्या-नंतरही एखादीसुद्धां शिवी हांसडण्याची सोय नसते ! शिवाय मोठ्यानें शिव्या हांसडून मग भिकाऱ्याला एखादा पैसा दिल्यानें, चारचौघांत आपल्या दानशूरतेची जी जाहिरात होत असते, ती पुढाऱ्यांच्या बाबतींत होऊं शकत नाहीं !

दुसरा एक फरक असा कीं, भिकारी हा बहुधा एकेकटाच दात्यावर हल्ला चढवितो. पण पुढाऱ्याच्या पाठीशीं थोडेंबहुत तरी अनुयायांचें सांघिक बळ असतें. म्हणजेच त्याचा हल्ला सुसंघटित, अतएव तोंड देण्यास किंवा तोंडसुख घेण्यास अंमळ जड असतो. आणखी एक फरक असा कीं, भिका-ऱ्याच्या अंगीं थोडीबहुत माणुसकी असते. तशी ती पुढाऱ्याच्या अंगीं असून चालत नाहीं. भिकाऱ्याला पैसे किंवा कांहीं वस्तु दिली तर तो कृतज्ञतापूर्वक दुवा तरी देतो. पण कित्येक फडगुंड पुढारी चार आठ आण्याच्या खालच्या रकमेची रीतसर पावतीही द्यायला तयार नसतात ! पुढाऱ्याला एखादी वस्तु देणगी म्हणून दिली तर तिचा, आणि त्याबरोबरच ती देणाराच्या भावनांचा, लिलांव करण्यास तो बिलकुल कचरत नाहीं !

पुढारी आणि भिकारी या दोघांचीही तुरुंगांत जाण्याला सारखीच तयारी असते. फरक इतकाच कीं, तुरुंगांत जाण्याचा प्रसंग आला तर पुढाऱ्याचा भाव वाढतो; पण भिकाऱ्याचा भाव किंचितहि न वाढतां उलट कमी होण्याचा संभव असतो !

याप्रमाणें पुढारी आणि भिकारी यांच्यांत पुष्कळसें साम्य असलें तरी त्यांतल्या पहिल्यावर जनतेचा कृपाकटाक्ष असतो; पण दुसऱ्यावर मात्र नुसताच कटाक्ष असतो !

× × × ×

प्रतिष्ठित भिकाऱ्यांत आणखी एक वर्ग आहे. तो म्हणजे फुकट्या वाचकांचा ! रस्त्यावरच्या भिकाऱ्यांबद्दल गैरवाजवी तिरस्कार समाजाच्या रोमरोमांत भिनलेला आहे. भिकाऱ्यांच्या पंक्तीस बसण्यालायक पुढाऱ्यांबद्दलही, त्यांचें सत्य—स्वरूप उघड झाल्यास, समाजाला तिरस्कार वाटतो; पण साहित्यक्षेत्रांत प्रामाणिकपणें काबाडकष्ट करणाऱ्या लेखकांच्या पोटावर पाय आणणाऱ्या, फुकट्या वाचकांसारख्या प्रतिष्ठित भिकाऱ्याबद्दल मात्र समाजांत अजून जरूर तेवढा तिटकारा उत्पन्न झालेला नाहीं. इतर कोणत्याही करमणुकी· साठीं रोख पैसे मोजणारा माणूस पुस्तकांची भीक मागण्यांत मात्र लाज बाळगीत नाहीं. कारण देणारा त्याच्याबद्दल तिरस्कार दाखवीत नाहीं !

भिकारी, पैशाबरोबरच, आपल्या दात्याला ' धर्म ' करण्याची संधि दिल्याचें पुण्य कनवटीला लावूं पहातो. फंडगुंड पुढारी, दात्याला देशसेवेस हात-भार लावण्याची संधि देण्यांत आपणच त्याच्यावर उलट उपकार करीत आहोंत, अशा थाटानें वागत असतो. पुस्तकाची भीक मागणारा वाचकही, पुस्तकाच्या मालकाला ज्ञानदानाचें महत्कार्य करण्याची संधि आपण देत आहोंत,—त्याच्या संग्रहीं धूळ खात पडलेलें पुस्तक आपण सार्थकीं लावीत आहोंत, असा आव आणण्यास कमी करीत नाहीं. पुस्तक फुकट वाचायला मागणें लांच्छनास्पद नाहीं, पण तें वाचायला देण्याचें नाकारणें मात्र लांच्छनास्पद आहे, अशी प्रत्येक फुकट्या वाचकाची समजूत असते. अशा फुकट्या वाचकांना आणि त्यांच्या कोटिक्रमाला आपण ' भीक ' घालतां कामा नये !

---

## १८ : : सल्ला आणि 'फी'!

ही कीं ती ?
दोघींपैकीं कोणतीची निवड करावी !

प्रेम कीं पैसा ?

दोहोंपैकीं कशाचा स्वीकार करावा ?

त्याच्यापुढें मोठा पेंच पडला होता.

'ही' म्हणजे इंदू त्याची प्रेमदेवता होती. तिचेंही उलट त्याच्यावर गाढ प्रेम होतें. तिच्याशीं लग्न केल्यास आपल्याला वैवाहिक सौख्याचा आनंद मनमुराद लुटतां येईल याबद्दल त्याला शंका नव्हती. पण....

इंदू एका गरीब कारकुनाची मुलगी होती. हुंडा म्हणून शेंदोनशें रुपयेसुद्धां तिच्या बापाकडून मिळण्याची आशा नव्हती. आणि त्याच्या उलट 'ती'—

बिंदू एका कंत्राटदाराची मुलगी होती. तिच्याशीं लग्न केल्यास उभ्या आयुष्यांत पैशाची फिकीर करण्याचें त्याला कारण नव्हतें.

शिवाय उच्च शिक्षणासाठीं परदेशीं जाण्याची त्याची महत्त्वाकांक्षाही बिंदूशीं लग्न केल्यास त्याला पुरी करून घेतां येणार होती. पण—

## चोरटे हल्ले

बिंदू अगदीं, म्हणजे अगदींच कुरूप होती. अर्थात् त्याचें तिच्यावर प्रेमही नव्हतंच.

आणि म्हणूनच त्याला मोठा पेंच पडला होता.

' ही कीं ती ? प्रेम कीं पैसा ? '

× × ×

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळ झाली, तरी त्याचा निर्णय ठरला नव्हता. उलटसुलट विचारांचें त्याच्या डोक्यांत नुसतें काहूर माजलें होतें.

इतक्यांत त्याचा जिगरदोस्त गदाधर त्याच्या खोलींत आला. तो चपापला !

" कां रे इतका दचकलास ? आणि तळहातावर गाल टेंकून कसला एवढा गंभीर विचार चालवला आहेस बाबा ? " गदाधर त्याच्या पाठीवर थाप मारीत म्हणाला.

क्षणभरच तो घुटमळला. ' सांगावें कीं न सांगावें ? ' पण शेवटीं त्यानें आपलें मन मित्राजवळ मोकळें करण्याचें ठरविलें.

आपल्यापुढील बिकट पेंचप्रसंग त्यानें गदाधराला सविस्तर समजावून दिला, आणि आपल्याला सल्ला देऊन या पेंचप्रसंगांतून मुक्त करण्याची त्यानें त्याला अगदीं गळ घातली.

" हात्तिच्या ! हा रे कसला बिकट प्रश्न ? नाटकें घे, कादंबऱ्या घे, बोलपट घे, आणखीन् कांहीं घे, यांतल्या एका तरी नायकानें पैशासाठीं आपल्या प्रेमदेवतेचा अवसानघात केला आहे काय ? स्वर्गीय प्रेमापुढें स्वर्गाचें राज्यसुद्धां तुच्छ आहे ! माधव जूलियनच्या त्या ओळी–' प्रेम लाभे प्रेमळाला । त्याग ही त्याची कसोटी ॥ ' विसरलास काय ? पैशाच्या पाठीमागें लागून प्रेमाकडे पाठ करणें, म्हणजे माणुसकीवर पाणी सोडणेंच नव्हे काय ?..."

" बस् बस् बस ! ठरला माझा निश्चय. माझ्या लाडक्या इंदूशींच लग्न करणार मी !"

" ठरलें ? अगदीं ठाम ? " गदाधर हुरळून म्हणाला,—" बरं, मग आतां मी असं म्हणतों, तेवढा त्या बिंदूच्या बापाचा पत्ता देईनास मला !"

---

# १९ : : लांच खाण्याचा कायदेशीर मार्ग !

जबलपुरांतील एका खेड्यांत भिक्षुकी करणाऱ्या एका उपाध्याकडून लांच खाल्ल्याच्या आरोपावरून, एका नवीनच नेमलेल्या सबइन्स्पेक्टराला नुकतेंच नोकरींतून बडतर्फ करण्यांत आलें. या सबइन्स्पेक्टराची मला कींव येते ! लांच खाणारा प्राणी दुनियेंत हा एवढाच एक निपजला असेल असें मुळींच नाहीं. पण लांच खाल्ल्यानंतर कायद्याच्या कचाट्यांत सांपडणे हें मात्र त्याच्या पेशाला शोभेसे झालें नाहीं ! त्याच्या ठिकाणीं दूरदृष्टीचा अभाव असल्याचा हा परिणाम होय !

सदरहू सबइन्स्पेक्टराची मुळांतच दिशाभूल झाली. लांच खाऊनसुद्धां कायद्याच्या कचाट्यांत न सांपडता, समाजांत उजळ माथ्यानें वावरणें त्याला साधलें असतें; पण दूरवर विचार न करतां आपला मार्ग आंखण्याची चूक त्यानें केली, आणि आंधळ्या न्यायदेवतेच्या तडाख्यांत बिचारा अचूक सांपडला ! त्याला लांच खायची होती तर त्यानें पोलीस खात्यांत न शिरतां त्याऐवजीं भिक्षुकी करणारा उपाध्याय व्हायला पाहिजे होतें ! कायद्याच्या कचाट्यांत न सांपडतां लांच खाण्यासाठीं भिक्षुकीसारखा सुरक्षित धंदा दुसरा कोणताच नाहीं.

× × × ×

ईश्वराकडे वशिला बांधून स्वर्गांत चांगली 'जागा' मिळवून देण्याचें आमिष दाखवून, आपल्या यजमानाकडून आणि गरीब बायाबापड्यांकडून, निरनिराळ्या धर्मकृत्यांच्या नांवाखालीं दक्षिणेच्या रूपानें पैसा उकळणें, म्हणजे धडधडीत लांच खाणें नव्हे काय? ईश्वराला इहलोकच्या कोर्टांत साक्षीसाठीं खेंचणें शक्य असतें तर भिक्षुक लांच खातात हें सिद्ध करणें मुळींच अवघड नव्हतें. देव-धर्मांच्या नांवाखालीं भिक्षुक यजमानाकडून जो पैसा उपटतात त्यापैकीं एका पैचा तरी ईश्वराकडे,—कोणत्या ना कोणत्या रूपानें कां होईना, ते कधीं भरणा करतात काय? ईश्वर 'निराकार' असल्यामुळें रोख रक्कम त्याच्या स्वाधीन करण्याचा प्रश्न अर्थात् उद्भवतच नाहीं!

इतर लांचखाऊ माणसांपेक्षां लांचखाऊ भिक्षुक अधिक भाग्यवान् म्हटला पाहिजे. कायद्याच्या कचाट्यांत तर तो कधीं सांपडत नाहींच; पण खाल्लेल्या लांचाच्या मोबदल्यांत विशिष्ट कामगिरी पार पाडण्याची जी जबाबदारी इतर लांचखाऊ माणसांवर पडत असते, तिचीही भिक्षुकाला कधीं बाधा होत नाहीं. कारण मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं. त्यामुळें स्वर्गांत आपल्याला जागा मिळते कीं नाहीं, हें यजमानाला स्वतः मेल्यावांचून समजणें शक्य नसतें. आणि मेल्यानंतर आपल्याला स्वर्गलोकचे दरवाजे बंद आहेत असें त्याला आढळून आलें, तरी इहलोकीं परत येण्याचा मार्गही बंद झाल्यामुळें आपल्या लांचखाऊ उपाध्याची मानगूट धरून लांचाचे पैसे त्याच्या-जवळून परत वसूल करण्यासही तो असमर्थ असतो!

पण वस्तुस्थिति विचारांत घेऊन तर्कच चालवायचा म्हटला तर भिक्षु-कांच्या वशिल्यानें स्वर्गप्राप्ति होत नसावी असेंच अनुमान काढावें लागेल. कारण ईश्वराकडे वशिला बांधण्यासाठीं भिक्षुक जे धार्मिक 'कानमंत्र' करीत असतात त्यांचा अर्थ तरी ईश्वराला कळत असेल काय? खुद्द भिक्षुकालाच आपण काय बडबडतों हें पुष्कळदां माहीत नसतें; मग ईश्वराला तें कोठून कळणार?

दुसरें असें कीं, प्रत्येक लुंग्यासुंग्या भिक्षुकाच्या वशिल्यानें प्रत्येक यज-मानाला किंवा कुळाला स्वर्गांत जागा मिळत असती, तर स्वर्गाच्या प्रवेशद्वारावर 'नो व्हेकन्सी' अशी पाटी पाहून, परत भूलोक गांठण्याचा प्रसंग कोट्यवधि

लोकांवर या पूर्वीच आला नसता काय ? स्वर्गात कितीही जागा असली तरी तिला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं ? एकदां स्वर्गात गेलेला माणूस मरण्याचा सुतराम् संभव नसल्यामुळें तेथील लोकसंख्य कधीं काळीं कमी होईल, आणि भूलोकच्या थोड्या तरी लोकाचा मधून मधून तेथें नंबर लागेल अशीही आशा करायला नको !

लांच खातो तर खातो, आणि त्याच्या मोबदल्यांत काडीचाहि फायदा करून देत नाहीं असा हा भिक्षुक म्हणे भूदेव ! ज्यांची देवावर श्रद्धा आहे त्यांनींसुद्धां वास्तविक या लांचखाऊ भूदेवांना यथेच्छ भोजन न घालतां, उलट त्यांची उपासमार केली पाहिजे. त्यासून त्यांना पुण्यच लागेल. कारण ते एक प्रकारें देवांची विटंबना करतात. नांवाची इमिटेशन करून लोकांना ठकवतात ! भू'देव' या इमिटेशनच्या नांवामुळें लोक फसगतीनें त्यांच्यावरून देवाच्या चारित्र्याचा अंदाज बांधू लागतील तर तो देवही असाच लांचखाऊ आहे, असा त्यांचा गैरसमज होण्याचा संभव असतो. तो न व्हावा म्हणून भूदेवांचा वृत्तिच्छेद केला पाहिजे. लांच खाण्याची संधी त्यांना मुळांतच देतां कामा नये.

दिवसभर खपून घामाच्या रूपानें शरीरांतून रक्त गाळणाऱ्या आपल्या दरिद्री धर्मबांधवांना ज्यावेळीं एक वेळ पोटभर जेवायला मिळण्याची पंचाईत पडत आहे, त्यावेळीं भिक्षुकांना आग्रह करकरून, त्यांच्या पोटाला नको असून, ओकारी येईपर्यंत भोजन चारण्यांत येत असतें, आणि वर दक्षिणेच्या रूपानें आणखी लांच दिली जात असते. मेलेल्या माणसांचे प्रतिनिधी म्हणून पंचपक्वान्नांवर फुकटांत ताव मारण्याची, आणि वर्षाचे बारा महिने दुसऱ्याच्या जिवावर जगण्याची या लांचखाऊ जित्या आयतोबांना जडलेली खोड, मरण्याची पाळी आल्याखेरीज सुटायची नाहीं. म्हणून लोकांनीं त्यांची उपासमार केली पाहिजे.

पण लोक असें करणार नाहींत. मद्यप्याला मद्यपानाचे दुष्परिणाम समजावून देणें व्यर्थ ठरतें. तसेंच खुळया धार्मिक कल्पनांचे दुष्परिणाम सर्वसामान्य माणसांना पटणें कठीण ! लांचखाऊ भिक्षुकांचा पुरता बंदोबस्त करायचा असेल तर, त्यासाठीं दारूबंदीसारखा भिक्षुकीबंदीचा कायदाच केला पाहिजे. तरच

लोकांची नागवणूक थांबेल. भिक्षुक स्वतःच्या कर्तृत्वावर पोट भरतील, आणि एकंदरीत समाजाची अधिक प्रगति होईल.

लांच खाणें हा एकदां कायद्यानें गुन्हा ठरविल्यानंतर लांच खाण्याचे जितके म्हणून प्रकार असतील तितके सगळे कायद्यानें बंद पाडले पाहिजेत. भिक्षुकी हा लांच खाण्याचाच एक प्रकार आहे, आणि म्हणून भिक्षुकी हा कायद्यानें गुन्हा ठरविणें अवश्य आहे, असें माझें ठाम मत आहे. तसें न केल्यास तो अन्याय ठरेल.

सुरुवातीचेंच उदाहरण घ्या. ज्या उपाध्याकडून सब इन्स्पेक्टरानें लांच खाल्ली त्या उपाध्यानें आपल्या यजमानांकडून आणि इतर बायाबापड्यांकडून मोक्षप्राप्तीचें आमिष दाखवून काय थोडा लांच खाल्ला असेल ? पण कायदा त्याच्या शेंडीचा एक केंसही उपटूं शकत नाहीं. आणि उपाध्यानें अजूनपर्यंत खाल्लेल्या लांचाचा थोडासा हिस्साच सबइन्स्पेक्टरनें खाल्ला असेल. पण त्याला मात्र नोकरींतून बडतर्फ व्हावें लागलें. ' कायदा गाढव आहे ' म्हणतात तो असा ! पण माणूस तर माणूसच आहे ना ? मग या ' गाढवा ' ला योग्य ठिकाणीं सतत फटके मारीत राहून, त्याला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करणें हें त्याचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य माणूस पार पाडीत नसेल तर त्याला असे फटके मारणें मला भाग पडेल.

देवाच्या नांवाची इमिटेशन करून पावित्र्यविडंबन आणि लोकांची फसवणूक करणाऱ्या भू'देवां'वर मात्र, पुण्याच्या संस्कृति–संरक्षक मंडळानें देवांच्या वतीनें फिर्याद करणें अवश्य आहे, एवढेंच जातांजातां सुचवितों !

---

## २० : : व्यवहारज्ञ !

मोठा व्यवहारज्ञ म्हणून सर्व लोक त्याच्याशीं नेहमीं जपूनच वागत असत !

' व्यवहारज्ञ ' हा पाजीपणावर पांघरूण घालायला पुष्कळदां उपयोगी पडणारा बहुमोल शब्द त्याला लागू करण्यांत, त्या शब्दाची अनाठायीं उधळपट्टी होत नाहीं, हें त्याला ओळखणारा कुणीही मनुष्य सांगूं शकेल !

स्वतःच्या पदराला खार न लागूं देतां, दुसऱ्यांना बनवून स्वतःचा फायदा कसा करून घ्यावा हें त्याच्यासारखें फक्त तोच जाणे !

एकदां फटका बसलेला मनुष्य पुन्हा त्याची संगत करतो कशाला ? त्यामुळें त्याला नित्य नवीं कुळें गांठावीं लागत, आणि नित्य नवी शक्कल लढवावी लागे. पण या कामांत त्याचें डोकें विलक्षण चालत असे.

एके दिवशीं भाजीची झोळी घेऊन तो घरीं परत चालला होता. तीन दमडीची मिरच्याकोथिंबीर आणि दिडकीची अळवाची जुडी यांचा सौदा मनाजोगा कुठेंच जुळेना, म्हणून मार्केटांतल्या मार्केटांतच त्याची मैल दीड मैलाची रपेट सहज झाली असेल ! त्याला अंमळ थकल्यासारखें वाटलें. त्यानें आजूबाजूला पाहिलें.

## चोरटे हल्ले

मागून एक रिकामा टांगा येतांना दिसला. तो जवळ येतांच त्यानें हटकलें,—

" ए ऽ ऽ टांगेवाला. "

" काय साहेब, टांगा पाहिजे ? "

" रिकामाच चालला आहेस ना तूं ? "

" त काय साहेब, प्यासिंजर न्हाई त काय दगड न्हाई ना भरायचे टांग्यांत ? "

" मग बसूं का मी आंत ? स्टेशनच्या रस्त्यानंच जाणार ना तूं ? माझं बिऱ्हाड वाटेंतच आहे. "

" बसा शेट. पण काय देणार ? "

" अरे द्यायचं काय ? नाहीं तरी रिकामाच जाणार ना तूं ? आतां कांहीं तुला भाडं मिळत नाहीं ना ? मग मी आंत बसलों तर बिघडलं कुठें ? माझं बिऱ्हाड आलं म्हणजे मी आपला उतरून जाईन ! "

" असं म्हनतां होय साहेब ! पन असं बघा, माझं हें घोडंबी लई थकलंया. तवां याला बांधूं या मांगल्या बाजूला, अन् तुमी घ्या त्याची जागा. तुमी बी रिकामेच चाललायासा न्हव का शेट ? "

---

## २१ : : भलेपणापासून सावध !

एखाद्या ठिकाणीं मागच्या दरवाज्यानें प्रवेश करणें हा अप्रतिष्ठितपणाचा मार्ग समजला जातो, आणि पुढच्या दरवाज्यानें प्रवेश करण्याची संधि मिळणें म्हणजे सुप्रतिष्ठितपणाचा गौरव समजला जातो. पण ही सर्वसाधारण समजूत खरी आहे काय ?

मी म्हणतों नाहीं. आणि तुम्हालाही हें कबूल करावें लागेल ! दुनिया दिवसें-दिवस बदलत चालली आहे. 'आजकाल भल्याची दुनिया नाहीं,' हें तत्व, कित्येक जाहिरातदार स्वतःच्या कनवटीचे पैसे खर्च करून तुमच्या डोक्यांत ठसविण्याचा प्रयत्न करीत आहेत. जगाच्या कल्याणासाठीं झटणाऱ्या या 'संताच्या विभूतीं'च्या सदुपदेशाच्या मुळाशीं काय हेतु आहेत हें येथें पहाण्याचें आपल्याला कारण नाहीं. परंतु त्यांनीं उपदेशिलेलें तत्व अगदीं खरें आहे, अशी निदान माझी खात्री पटली आहे. आजकाल भल्याची दुनिया नाहीं खरीच !

कारण, सुधारणेच्या मार्गावर असलेल्या या बदलत्या जगांत भलेपणाच्या किंवा सभ्यतेच्या कल्पना बदलत आहेत. त्या कल्पनांनुसार सभ्यासभ्यतेचे नियमही बदलत आहेत. चालू काळांत कांहीं ठिकाणीं पुढच्या दरवाज्यानें प्रवेश करण्याऐवजीं मागच्या दरवाज्यानें प्रवेश करणेंच सभ्यतेचें समजलें जातें ! उदाहरणार्थ ट्रॅममध्यें.

## चोरटे हल्ले

पुरुषांनीं पुढच्या दरवाज्यानें ट्रॅममध्यें प्रवेश केला, तर सभ्यतेच्या नियमाचें उल्लंघन होतें. ट्रॅम कंपनीच्या कायद्याचें उल्लंघन होतें. कायद्यानें आंखून दिलेला, आणि नंतर सभ्यतेच्या नियमांत समाविष्ट झालेला हा निर्बंध स्त्रियांना लागू नाहीं. त्यांना पुढच्या दरवाज्यानें ट्रॅममध्यें प्रवेश करण्याची मोकळीक आहे. असा पक्षपाती कायदा करण्यांत ट्रॅम कंपनीचा काय हेतु आहे ?

ट्रॅम कंपनी स्त्रियांना भलतेंच स्वातंत्र्य देऊं इच्छिते असें आम्ही पुरुषांनीं कां म्हणूं नये ? आधुनिक काळ हा स्त्रियांनीं अ'मर्याद' स्वातंत्र्य उपभोगण्याचा काळ आहे, असेंच ट्रॅम कंपनीला पुरुषांना बजावायचें आहे काय ? एक वेळ पुरुषांनीं सभ्यतेचा आणि सदाचरणाचा मार्ग सोडला तरी चालेल, पण स्त्रियांनीं वाममार्ग स्वीकारला तर तो भयंकर अनर्थ होय, या सनातन विचारसरणीचा, स्त्रियांना भलतेंच स्वातंत्र्य देऊन, नवा काळ सूड उगवीत आहे, असें समजून आम्ही स्वस्थ बसावें काय ?

वास्तविक स्त्रियांनीं मागच्या दरवाज्यानें, आणि पुरुषांनीं पुढच्या दरवाज्यानें प्रवेश करायचा ही अजूनपर्यंतची आमची परंपरा. पण आज पहावें तों उलटा न्याय ! आणि हा न्याय अमान्य करील तो पुरुष असभ्य ! हा जुलूम झाला !

स्त्रियांना याप्रमाणें पुढच्या म्हणजे असभ्यतेच्या मार्गानें प्रवेश करण्याचा ट्रॅम कंपनीनें दिलेला हक्क आम्ही एक वेळ बिनतक्रार मान्य केला असता. निष्कारण तो हक्क बळकावण्याचा विचार आमच्या मनांत चुकूनसुद्धां आला नसता. कारण आम्हाला सभ्यतेची चाड आहे. पण या सभ्यतापालनापायीं, व्यवहारांत आमचें पाऊल अगदीं अक्षरशः मागें पडत असतां, आणि त्यामुळें आमचें नुकसान होत असतां, आम्ही तक्रार न करतां स्वस्थ बसावें अशी अपेक्षा करणें न्याय्य आहे काय ?

निरनिराळ्या क्षेत्रांत आज स्त्रियांनीं पुरुषांशीं स्पर्धा मांडली आहे, आणि पुरुषांच्या वर कडी करण्यासाठीं चंग बांधला आहे. असें असतां, स्त्रियांनीं मात्र खुशाल पुढच्या दरवाज्यानें ट्रॅममध्यें घुसून आमच्यापुढें मजल मारावी, आणि आम्ही मात्र मागच्या दरवाज्यानें गर्दीमुळें प्रवेश मिळत नाहीं म्हणून ट्रॅमच्या

ठाणकावर ( स्टॅंडवर ) एखाद्या दिव्याच्या खांब्यासारखें तासन् तास तिष्ठत उभें रहावें, हें आम्हांला सहन होणें कसें शक्य आहे!

स्त्रियांच्या स्पर्धेचा प्रश्न एक वेळ बाजूला ठेवला, तरी आजच्या घड्याळाच्या गुलामगिरींत यत्किंचित् हयगय झाल्यास या ना त्या प्रकारानें भयंकर नुकसान सोसावें लागण्याच्या या काळांत, माणसानें किती वेळ रखडपट्टी सोसावी? अशा परिस्थितींत सभ्यतेचे नियम संभाळण्यापायीं एकाच ठिकाणीं उभें रहाण्यापेक्षां, पुढच्या दरवाज्यानें ट्रॅममध्यें घुसून स्वतःची ' प्रगति ' करून घेणेंच इष्ट नाहीं काय?

× × ×

म्हणून म्हणतों, बाबानों, भलेपणापासून सावध. सभ्यतेच्या आहारीं जाऊं नका! खुशाल पुढच्या दरवाज्यानें ट्रॅममध्यें घुसा आणि पुढची मजल गांठा. कित्येक मवाली लोक असें करतातच. स्त्रियांची चढउतर पुढच्या दरवाज्यानें होत असतांना तसें करणें त्यांना अपरिहार्य होऊन बसतें! अशा मवाल्यांना माझ्या उपदेशाची जरूर नाहीं. पण माझे वाचक मवाली नाहींत. ( दुर्दैव त्यांचें आणि माझें! ) म्हणून त्यांना या उपदेशाची जरूर आहे.

× × ×

पुरुषांनीं मागच्या दरवाज्यानेंच प्रवेश करणें सभ्यतेचें, आणि स्त्रियांना मात्र राजरोस पुढच्या दरवाज्यानें प्रवेश करण्याची मोकळीक! असा, परंपरेनें चालत आलेल्या सभ्यतेच्या समजुतीला काळिमा लावणारा कायदा जर ट्रॅम कंपनी करूं शकते, तर तुम्ही तरी सभ्यतापालन, भलेपणा संभाळणें, हें आपलें कर्तव्य आहे, असली खुळी सनातन समजूत कां उराशीं बाळगावी? ' सत्यमेव जयते ' या जुन्या दगाबाज नीति-तत्वाऐवजीं " शाठ्यमेव जयते " या नव्या अनुभवसिद्ध तत्वज्ञानाचा स्वीकार तुम्हीही कां करूं नये?

× × ×

## चोरटे हल्ले

ट्रॅमच्या मागच्या दरवाज्यावर सैतानाप्रमाणें उभा राहून, ' पिछे गाडी, पिछे गाडी, ' म्हणून तुमची पिछेहाट करणारा, आणि त्याच वेळीं पुढच्या दरवाज्यानें घुसणाऱ्या मवाल्यांच्या ' अविनय ' कायदेभंगाची दाद न घेतां खुशाल त्यांची ट्रॅममध्यें भरती होऊं देणारा, कंडक्टर हा एक अजब माथेफिरू प्राणी असतो. त्याचीं आर्जवें करून किंवा त्याच्याशीं हुज्जत घालून निष्फळ ' सत्याग्रह ' करण्यापेक्षां पुढच्या दरवाजानें आंत घुसून शठांच्या मार्गानें आपली प्रगति करून घेणेंच श्रेयस्कर !

---

## २२ : : संपादिका आणि तिचा कुत्रा

दवाखाना चालेना, म्हणून त्यानें एक वर्तमानपत्र काढण्याचें ठरविलें. नाटकें-सिनेमा पहाण्याचा त्याला आणि त्याच्या बायकोला मोठा शौक ! तो तरी फुकटांत भागवितां येईल, हा वर्तमानपत्र काढण्यांत एक हेतु !

संपादिका म्हणून आपल्या वर्तमानपत्रावर बायकोचें नांव छापण्याचें त्यानें ठाम ठरवून टाकलें, आणि अंमलांतहि आणलें. आतां, सौ. शेवंतीबाई तोंडवळकर ( अर्थात् त्याच्या बायकोचें नांव ) या जाहिरातींखेरीज दुसरें कसलें संपादन कधींच करीत नसत ही बाब वेगळी !

पण संपादिका म्हणून तिला पुढें करण्यांत त्याचा तरी आणखी काय हेतु होता ? जाहिराती गोळा करण्यास तिला हुरुप यावा यापलीकडे दुसरा कांहीं नाहीं आणि दयाळू ईश्वरानें तिला स्त्रीजातींत जन्मास घातलें असल्यामुळें त्याचा तो हेतु कल्पनेबाहेर सिद्धीस गेला ! सगळे जाहिरातदार तिच्यावर खूष होते. तिच्या जातीकडे आणि तोंडाकडे पाहून इतर वर्तमानपत्रांचीं सहा सहा महिन्यांचीं बिलें बुडविणारे जाहिरातदारसुद्धां तिची बिलें पटापट चुकवीत असत.

तिच्या नांवावर वर्तमानपत्राचा चिक्कार खप होईल ही त्याची अटकळ मात्र सपशेल चुकली ! नुसत्या नांवावर फसण्याइतके वाचक आतां भोळे राहिले नव्हते. ( जाहिरातदारांप्रमाणें तिचें प्रत्यक्ष दर्शन घडतें तर ते विरघळले असते, असा मात्र याचा अर्थ नव्हे ! ) आपल्या वर्तमानपत्राच्या न खपलेल्या अंकांच्या गठ्ठयांकडे पाहून, ' या रद्दीचें आतां करावें तरी काय ? ' या विचारानें तीं दोघें वरचेवर अस्वस्थ होत.

आपल्याला एखादें मूल असतें तर ही रद्दी सार्थकीं लागली असती, असाहि विचार त्यांच्या मनांत डोकावून जाई.

मुलाची उणीव भरून काढण्यासाठीं तिनें एक कुत्रा पाळण्याचें ठरविलें. नाइलाजास्तव त्यानें याला संमती दिली.

× × × ×

एका दिवशीं, तिला संपादिका या नात्यानें सिनेमाचे दोन ' फ्री पास ' मिळाले. आपल्या आवडत्या कुत्र्यासह आणि नवऱ्यासह सौ. तोंडवळकर सिनेमाच्या आवारांत दाखल झाल्या.

नवरा आणि कुत्रा यांचें लटांबर बरोबर घेऊन त्या थिएटरांत शिरणार, तोंच,—

"बाईसाहेब, कुत्र्याला आंत नेण्याचा हुकूम नाहीं." दरवाजावरील पठाणानें खडसावलें.

" अग बाई, खरं ऽ ऽ ? " बाईसाहेब पतिराजांकडे वळून साभिनय म्हणाल्या, " अहो, मग तुम्ही नका थिएटरांत येऊं. "

तो डोळे लाल करून तिच्याकडे पहातच राहिला. आजूबाजूचे लोक हंसूं लागले. तेव्हां कुठें तिच्या लक्षांत आलें.

" तसं नव्हे म्हणत मी. " ती मिस्किलपणें हंसत म्हणाली, " कुत्र्याला आंत न्यायची परवानगी नाहीं, तर तुम्हाला पण बाहेर नको का रहायला ? तुम्ही माझ्याबरोबर आंत आलांत तर कुत्र्याला कोण संभाळणार ? म्हणून म्हटलं, तुम्ही नका आंत येऊं ! "

---

## २३ : : निरर्थक पाट्या !

'फेरीवाल्यांस वर येण्याची सक्त मनाई आहे.' अशा मजकुराच्या पाट्या पांढरपेशांची वस्ती असलेल्या कित्येक चाळींच्या मजल्या-मजल्यावर जिन्याच्या तोंडाशीं लटकत असलेल्या मी पहातों. आणि पांढरपेशांची निरुपद्रवी 'रिकामपणची कामगिरी' या दृष्टीनें मला त्यांचें मोठें कौतुक करावेंसें वाटतें. पण या पाट्यांच्या उपयुक्ततेबद्दल जेव्हां मी विचार करूं लागतों, तेव्हां मात्र या पांढरपेशांच्या अकलेची मला कींव करावीशी वाटते. आणि आपला रिकामपणचा वेळ वामकुक्षी करून, किंवा पत्ते नाहीं तर सोंगट्या खेळून सार्थकीं लावण्याऐवजीं, हे हास्यास्पद उपद्व्याप करण्यांत ते कां खर्चीं घालतात असा मला प्रश्न पडतो.

चाळीच्या पहिल्या मजल्यावर,'फेरीवाल्यांस वर येण्याची सक्त मनाई आहे,' अशी पाटी लटकावल्यानंतर पुन्हां दुसऱ्या आणि तिसऱ्या, किंवा किती असतील तितक्या मजल्यांवर अशा पाट्या लावण्यांत येतात, या मूर्खपणाला तर काय नांव द्यावें हेंच मला समजत नाहीं. तिसऱ्या मजल्यावर अशी पाटी पुन्हां लटकावणें म्हणजे पहिल्या आणि दुसऱ्या मजल्यावरील "सक्त मनाई" ची उपेक्षा करण्याचा सदर परवानाच नव्हे काय ? आणि पर्यायानें सगळयाच पाट्या निरर्थक

असल्याचें ( आणि पांढरपेशांच्या अकलेचें दिवाळें निघालें असल्याचेंही ) निदर्शक नाहीं काय ? एकदां, दोनदां, तीनदां, लेखी ताकीद मिळाल्यानें फेरीवाल्यांवर इष्ट परिणाम होऊन ते तिसऱ्या मजल्यावरून तसेच माघारीं फिरतील अशी पांढरपेशांची अपेक्षा असेल तर तीही व्यर्थ होय.

कारण ज्या फेरीवाल्यांसाठीं या " सक्त मनाई " च्या पाट्या असतात ते अक्षरशः अक्षरशत्रु असतात ! त्या पाटया वाचायला तर ते असमर्थ असतातच; पण आपल्या बंदोबस्तासाठीं चाळींत पाटया लावण्यांत आल्या आहेत याचीही त्या बिचाऱ्यांना दाद नसते !

असें असतांना असल्या पाटया लटकावणें म्हणजे फेरीवाल्यांच्या बंदोबस्ताऐवजीं स्वतःच्या अडाणीपणाचें प्रदर्शन करणें, आणि फेरीवाल्या अडाण्यांहून आपण अडाणी असल्याचें सिद्ध करणें नव्हे काय ?

× × ×

रस्त्यारस्त्यांतून आणि गल्लीगल्लींतून 'येथें घाण करूं नये,' 'येथे थुंकू नये,' ' येथें पिसाब करूं नये, ' अशा पाटया आढळतात. त्याही अशाच मूर्खपणाच्या निदर्शक होत, अशी माझी एका काळी समजूत होती. पण ती समजूत माझ्याच मूर्खपणाची निदर्शक होती, असें आतां मला आढळून आलें आहे. अडाणी लोकानांच फक्त असल्या सूचनांची जरूर असते, आणि त्यांना त्या मुळांत वाचतांच येत नसल्यामुळें असल्या पाटयांची कांहीं जरूरी नाहीं, अशी माझी विचारसरणी होती. पण जे अडाणी नाहींत, जे स्वतःला सुशिक्षित समजतात, त्यांनासुद्धां, ' येथें घाण करूं नये, ' 'येथें थुंकू नये,' अशा सूचना, ( आणि त्याही कायद्याचा बडगा दाखवून, ) द्याव्या लागतात. आणि इतकें करूनही चोरून कायदेभंग करण्याची या स्वतःला सुशिक्षित समजणाऱ्या अडाण्यांच्या ठिकाणीं असलेली उपजतबुद्धि मधूनमधून उचल खात असते ! खरें म्हणजे हे सुशिक्षित लोक अडाण्यांहून अडाणी असतात. कारण अडाणी लोकांना वाचतां येत नाहीं, म्हणून ते असला समाजघातक कायदेभंग करतात. पण सुशिक्षित लोक वाचतां येत असून जाणूनबुजून हा असला समाजघातक अडाणीपणा करीत असतात ! एकंदरींत दोघांच्याही दृष्टीनें पाट्या निरर्थकच !

---

# २४ : : संपूर्ण वर्षभविष्य !

[ दहा वर्षांचें पंचांग, हजार वर्षांचें कॅलेंडर अशा कित्येक नवीन टुमी आजकाल निघत आहेत. आम्हीही हा एक तसाच धाडसी प्रयोग करीत आहों. आमचें संपूर्ण वर्षभविष्य आणखी कित्येक वर्षं उपयुक्त ठरेल अशी उमेद वाटते. ]

नवें वर्ष सुरू झालें ! " नवें वर्ष तुम्हाला सुखाचें जावो ! " असें धंदेवाईक आणि गोडबोल्ये लोक आज ज्याला त्याला सांगत सुटतील ! पण त्यांच्या शुभाचिंतनावर भरंवसा ठेवूं नका. " जगीं सर्व सूखी असा कोण आहे ?" हें नीट ध्यानांत ध्या. आणि तुम्ही स्वत:सुद्धां "नवें वर्ष तुम्हाला सुखाचें जावो." अशा शुभोद्गारांची फुकट खैरात करण्याच्या इंग्रजी रूढीला बळी पडूं नका. उगाच तुमची बत्तिशी अपशकुनी ठरेल !

नवें वर्ष सर्वस्वी सुखाचें जाईल अशी आशा बिलकूल धरूं नका. ' जीवन म्हणजे झगडा आहे ! ' त्यांत येणाऱ्या असंख्य आपत्तींना आनंदानें तोंड देण्याची तयारी ठेवा. आंतून चिंतेच्या सहस्र इंगळ्या डसत असल्या तरी बाह्यात्कारीं हंसून आला दिवस साजरा करण्याची तयारी ठेवा. काळाच्या विशाल उदरांत काय आपत्ती सांठवून ठेवल्या आहत हें फक्त ज्योतिषी म्हापणकरांनाच काय तें सांगतां येण्यासारखें आहे अशी समजूत करून घेऊं नका.

ठोकळ मानानें मलाही तें सांगतां येईल ! आगामी संकटांची आगाऊ सूचना दिल्यानें त्यांवर काय उपाययोजना करावी हें आधीं ठरवून तुम्हाला नवें वर्ष थोडें फार तरी सुखांत घालवितां येण्यासारखें असल्यामुळें, मी त्या आपत्तींचा पाढा येथें वाचतों:—

राजकीय क्षेत्रांत, पुढाऱ्यांची शक्य तों तुरुंगाबाहेर राहून जास्तींत जास्त पत्रकें काढण्याबाबत चुरशीची चढाओढ लागेल. तुम्ही त्यांच्या पावलावर पाऊल टाकून चाला. सामाजिक क्षेत्रांत, झाडून सगळ्या वर्तमानपत्रांतून नवमतवाद विरुद्ध जीर्णमतवाद, बालविवाह, जरठविवाह, प्रौढाविवाह, प्रेमविवाह, घटस्फोट, ब्रम्हचर्य, संततिनियमन वगैरे विषयांवर सडकून चर्चा होईल, पण सामाजिक परिस्थितींत प्रत्यक्ष बदल फारसा होणार नाहीं. वर्तमानपत्रांमुळें प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या लोकांची अब्रू नेहमींच धोक्यांत राहील ! युनिव्हर्सिट्यांमधून हजारों ठराविक ठशाचे ठोकळे बाहेर पडतील. त्यांपैकीं बहुतेक सगळे " वाँटेड "चे कॉलम चाळून नोकरीसाठीं अर्ज खरडीत रहातील, आणि बाकीचे बेकारीला कंटाळून आत्महत्या करतील !

कॉलेजांतील विद्यार्थ्यांनों,—बाबानों, जरा जपून ! मुली आतांशा फार पुढें गेल्या आहेत. त्या तुम्हांला बनवतील. त्या तुम्हाला आग्रहानें इराण्याच्या हॉटेलांत खेंचून नेतील, आणि तेथील सर्व प्रकारच्या खाद्यपेयांवर तुमच्यासह आडवा हात मारून शेवटीं बिल देण्याच्या वेळीं तुमच्याकडे बोट दाखवतील. तेव्हां मुलींच्या बरोबर हॉटेलांत जातांना निदान आधीं खिसे चांचपून बघत जा. नाहीं तर फजितीची वेळ येईल ! विशेषतः गॅदरिंगच्या दिवसांत जास्त काळजी घ्या.

विवाहितांनीं खिसापाकीट संभाळून असावें. बायको खिशांतील पैसे केव्हां लांबवील याचा पत्ता लागणार नाहीं ! "मी मेल्यें म्हणजे सुटलेत एकदांचे." असा त्रागा बायको दिवसांतून सातदां करील. त्यामुळें नवऱ्यांना "रोज मरे तिथे कोण रडे" अशी वृत्ती धारण करण्याखेरीज इलाज रहाणार नाहीं ! अविवाहितांना उपवर मुलींच्या बापांपासून धोका आहे. त्यांनीं सावध रहावें. एखादवेळेस लग्न होण्याचा दाट संभव आहे. मागून पस्तावण्यापेक्षां आधींच सावध राहिलेलें काय वाईट ?

शाळेंत जाणाऱ्या मुलींना रस्त्यांत धक्के बसतील ! कांहीं घोडकुमारिका आणि मळमळीत सौभाग्यवती दुसरा कांहीं उद्योग नसल्यामुळें पुरुषजातीविरुद्ध बंड उभारतील. परंतु त्यांच्या चळवळीची उभारणी सर्वतोपरी पुरुषांकडून होणाऱ्या मदतीवरच अवलंबून राहील !

नित्याच्या व्यवहारांत फसवणूक होईल. वाणी लोक माझ्यासारख्या गिऱ्हाइकांना मापांत फसवतील. आपल्या दुकानांचा आणि वखारींचा विमा उतरलेले कांहीं व्यापारी आपल्याच दुकानांना आग घालून विम्याचे पैसे उपटण्याचा प्रयत्न करतील ! तर कांहीं मोठे व्यापारी धंद्यांत दिवाळें काढून घरीं दिवाळी साजरी करतील !

न्हावी गिऱ्हाइकांना नेहमीप्रमाणें सलूनमध्यें ताटकळत ठेवतील. धोबी गिऱ्हाइकांचे कपडे कधीं स्वतः वापरून, तर कधीं फाडून, परत आणतील ! एखादवेळेस ते कपड्यांसह बेपत्ता होण्याचाही संभव आहे. हॉटेलांत गेल्यास 'गरम' पदार्थांची यादी ऐकून तोंडाला पाणी सुटेल. प्रत्यक्ष पदार्थ पुढ्यात आल्यावर तोंडचें पाणी पळून जाईल! फेरीवाल्यांनीं वेळेनुसार पोट उपाशीं मारून-सुद्धां चार पैसे गांठीला बाळगून असावें. पोलीस रस्त्यावरून हकालपट्टी करूं लागले तर उपयोगी पडतील ! पादचाऱ्यांना मोठे वाईट दिवस आहेत. रस्त्याच्या मधून चालल्यास मोटारी धक्के मारतील; फूटपाथवरून चालल्यास मुली धक्के मारतील; क्वचित् वेणीचे शेंपटे मारून पुरुषांचा विनयभंग करतील ! कचेरींत जाणाऱ्या कारकुनांनीं गाडी गांठण्यासाठीं पळतांना पायाखालीं पाहूनच धांवावें. अविवाहित कारकुनांनीं जास्त जपलें पाहिजे. शाळेंत जाणाऱ्या मुलींचे चेहरे न्याहाळूं नयेत. ठेंच लागून अपघात होण्याची धास्ती आहे ! पळतांना टोपी आणि पादत्राणें आपापल्या जाग्यावर असल्याची वरच्यावर खात्री करून घ्यावी.

थोडक्यांत सांगायचें म्हणजे केव्हां कोणावर काय प्रसंग येईल याचा नेम सांगवत नाहीं. परंतु एकंदरींत चालू वर्षांत अनेक घडामोडी होतील यांत शंका नाहीं ! हें सगळें वर्षभविष्य सांगण्याचें कारण इतकेंच, कीं 'नवे वर्ष सुखाचें जाईल' या आशीर्वादावर विश्वास ठेऊं नका ! त्यापेक्षां या वर्षभविष्यावर विश्वास ठेवा, आणि आगामी आपत्तींना कसें तोंड द्यावें याचा विचार करून ठेवा !

आणखी थोडें राहिलें,—

रोजनिशी विकत घेण्याच्या भानगडींत पडूं नका. पैसे फुकट जातील ! आळसामुळें सगळीं पानें वर्षअखेर कोरीं राहतील. अट्टाहासानें रोजनिशी लिहायचाच निर्धार केलात तर रोज रात्रीं, दिवसभराच्या कटकटींची आठवण ताजी होऊन रात्रभर धड झोंप लागणार नाहीं, हें अनुभवानें सांगतों. खर्चाचे आंकडे निरंतर स्मरणांत राहून रोजनिशी संपण्याच्या आंतच डोळे पांढरे होण्याचा संभव आहे. तेव्हां हें रोजनिशीचें विकत श्राद्ध कशाला घेतां ?

मित्रांचा विश्वास धरूं नका. तुम्ही हजार लटपटी करून मिळवलेलीं कॅलेंडरें ते केव्हां लांबवतील याचा पत्ता लागणार नाहीं ! तेव्हां फुकट कॅलेंडरें गोळा करण्याच्या भानगडींत पण पडूं नका. तुमचे मित्र तीं भिंतीवर टिकूं देणार नाहींत. बरें कडीकुलुपांत बंदोबस्तानें ठेवावीं तर फुकटांत मिळवलेलें हें " वैभव " चारचौघांच्या नजरेस पडावें कसें, आणि तुमच्या पराक्रमाची ( फुकटांत कॅलेंडरें मिळवण्याच्या ) जाहिरात तरी व्हावी कशी ?

---

## २५ : : बेपत्ता बायको !

फूटपाथवर बसणारा ज्योतिषी आणि हस्तरेषा–सामुद्रिक होता तो. स्वतःच्या भविष्यकाळाबद्दल तो नेहमीं फिकीरींत असे; तरी कोणाही गिऱ्हाइकाची कुंडली मांडून अचूक भविष्य वर्तवण्यांत त्याचा हात धरणारा कोणी नव्हता, अशी साक्ष त्याच्या पत्र्याच्या बॅगवर रंगविलेलीं अक्षरें ठळकपणें देत होतीं. उलट त्याला मात्र,–कधींकधीं कां होईना, लोकांचा हात धरण्याची संधि मिळत असे. मात्र लोक त्याला हात दाखवीत असें म्हणण्यापेक्षां, तोच लोकांना चांगला हात दाखवीत असे, असें म्हटल्यास तें अधिक बरोबर होईल.

पण एका दिवशीं त्यालाच कोणी तरी चांगला हात दाखविला !

बॅग कांखोटीस मारून तो घरीं येतो, तों बायकोचा कोठें पत्ता नाहीं ! खोलींतील सामानही अस्ताव्यस्त झालेलें दिसलें.

तो कांखेतल्या बॅगेसह पळतच पोलिस ठाण्यावर गेला, आणि तेथें असलेल्या पोलिस इन्स्पेक्टरला त्यानें घाबऱ्याघाबऱ्या सर्व हकीकत सांगितली.

" तुम्ही ज्योतिषी आहांत नाहीं का ? " इन्स्पेक्टरसाहेबांनीं विचारलें.

" हो, आपलं काम आहे कांहीं ? " कांखेतली बॅग हातांत घेत तो म्हणाला.

" तुम्हाला प्रश्न पाहतां येत असेल. "

" हो हो, यांत काय शंका ? "

" मग असं करा, तुमची बायको आत्तां कुठें आहे तें प्रश्न मांडूनच पहा ना तुमच्या ज्योतिषशास्त्राप्रमाणं. "

तो चपापला. त्यानें जरा चुळबूळ केली, आणि अंमळ तोंड वांकडें करून डोकें खाजवीत तो म्हणाला, " हरकत नाहीं म्हणा. पण माझे फीचे पैसे कोण देणार आहे ? "

आतां इन्स्पेक्टरसाहेबांची चपापण्याची पाळी आली.

" अरे, पण तुझी बायको तुला परत मिळेल ना ? " त्यांनीं हनुवटीवरचा हात न काढतांच विचारलें.

" भले ! म्हणजे बायकोसाठीं का मी इतका पळत आलों. अहो सगळे दागदागिने पण तिच्याबरोबर गेले आहेत ! "

इन्स्पेक्टरसाहेबांना पुन्हा आश्चर्याचा झटका बसला. " बरं बरं, होईल रीतसर तपास हं. " म्हणून ते वळणार तोंच तो अजीजीनें म्हणाला,– " आणि हें पहा साहेब, नुसते दागिने परत मिळाले तर येईन कोर्टांत मी, पण दागिन्याबरोबर बायकोचाहि पत्ता लागला तर केस कोर्टांत येण्यापूर्वी मला कळवा. "

" कशाला रे बाबा ? "

" म्हणजे मला कुठे तरी बेपत्ता व्हायला बरं ! "

---

# २६ : : साडेतीन तबकड्यांचें संशोधन !

काहीं माणसांना तारतम्य म्हणून कसें तें नसतेंच. आपला बडेजाव वाढविण्यासाठीं म्हणून तीं एखादी गोष्ट करतील, आणि नेमक्या त्याच गोष्टीमुळें लोकांकडून स्वतःची कुचेष्टा करून घेतील !

आमच्या शेजारीं असाच एक इसम रहातो. आपण मोठे श्रीमंत आहोंत, खर्चिक आहोंत, रसिक आहोंत असें लोकांवर इम्प्रेशन मारण्याची या गृहस्थाला मोठी हौस ! त्यासाठीं या गृहस्थानें सहा महिन्यांपूर्वी एक ग्रामोफोन खरेदी केला. बहुधा फोर्थ हँड असावा. म्हणजे दुसऱ्या कुणी तरी सेकंडहँड घेतलेला, तो या गृहस्थानें पुन्हां सेकंडहँड म्हणून खरेदी केला !

गृहस्थाला आपल्याकडे ग्रामोफोन आहे हें चारचौघांत समारंभपूर्वक जाहीर करण्याची एवढी खाज कीं रोज उठून तो नवेनवे इष्टमित्र गांठतो आणि अगदीं आग्रहपूर्वक त्यांना आपल्या घरीं घेऊन येतो. पदरचा चहा चिवडा त्यांना खाऊं घालतो, आणि ' बसा हो, बसा हो, जाल मग. '· करीत आपल्याजवळ असलेल्या साडेतीन रेकॉर्डस् त्यांना पुन्हा पुन्हा ऐकवून, शेवटीं नाइलाजास्तव ' या पुन्हा केव्हां तरी. ' म्हणून निरोप देतो.

साडेतीन म्हणण्याचें कारण असें कीं, चार रेकॉर्डस्पैकीं एका रेकॉर्डच्या एका बाजूचें गाणें, मध्येंच मोठा चरा पडल्यामुळें फारकरून वाजवलें जात नाहीं. बाकीच्या सात गाण्यांपैकीं चारांमध्यें काय मजकूर आहे हें मला आजमितास कळलेलें नाहीं. यावरून तीं कोणा उत्कृष्ट गवयाचीं असावींत असा तर्क कदाचित् कुणी करील. पण त्यानें मशारनिल्हे गृहस्थाच्या शेजारीं येऊन फक्त चार दिवस टिकाव धरावा असें माझें त्याला आव्हान आहे.

ज्या तीन गाण्यांतले बरेचसे शब्द जुळविण्यांत, गेल्या सहा महिन्यांच्या प्रयत्नांनंतर, माझ्या कित्येक मित्रांच्या सहाय्यानें मी यशस्वी झालों आहें, त्यांपैकीं एक गाणें ' संकट हें अनिवार ' असें कांहीं तरी आहे. हें गाणें मशारनिल्हे गृहस्थाच्या मोठें आवडीचें दिसतें. कारण तो तें वरचेवर लावतो. तें गाणें ऐकून मीहि आतांशीं मान डोलावतों. ' संकट हें अनिवार ' हें मला अगदीं बरोबर पटतें. आणि हा इषारा ऐकल्याबरोबर शक्य असेल तेव्हां तेव्हां, जणूं काय चाळीवर वैमानिक हल्ला होत असल्याचा इषारा मिळाल्यासारखा मी पळत सुटतों!

दुसरें गाणें 'रमला कुठे ग कान्हा' असें आहे मला वाटतें! हा उनाड कान्हा गेले सहा महिने कुठच्या कुंजांत रमला आहे कोण जाणे! तो अजून परत येत नाहीं. यामुळें मी व्रजवासिनी गोपिकांहून रडकुंडीस आलों आहें. 'मुलगा हरवला' म्हणून वर्तमानपत्रांत जाहिराती देऊन याचा शोध लागण्यासारखा असता तर खचित मी पदरचे पैसे खर्च करून तशी जाहिरात द्यायला कमी केलें नसतें! पोलिसांत वर्दी देऊन पहावी, असाही विचार मधून मधून मनांत डोकावून जातो. तसें केलें म्हणून या उडाणटप्पू बेपत्ता कान्ह्याचा शोध लागेल अशांतला भाग नाहीं. पण रात्रींबेरात्रीं त्याच्या नांवानें होणारी हांकाटी आणि हलकल्लोळ कदाचित् थांबेल, एवढीच आशा!

तिसरें गाणें ' डसला बोका आजि माणसा ' असें असावें, असें आपलें मी आपल्या मनाशीं कालपरवांपर्यंत ठरविलें होतें. एखाद्या आधुनिक कवीनें रचलेली ही एखादी विलापिका असावी, किंवा एखादें भावगीत असेल, असें समजून या चमत्कारिक चरणाच्या पुढील चरण समजून घेण्यास मी अतिशय उत्सुक झालों

होतों. पण कालच माझ्या एका मित्रानें माझी समजूत चुकीची असल्याचें ठासून सांगितलें. तें गाणें, ' डसला बोका...' वगैरे नसून 'बसला धोका अजि मानसा' असें आहे; आणि माझें संशोधन अजिबात चुकीच्या दिशेनें चाललें आहे, असें त्याचें म्हणणें आहे. अर्थात् मी तें कबूल केलेलें नाहीं. कारण माझ्या कानांइतकाच माझा त्याच्यावर विश्वास आहे. मी त्याला कॅटलॉग घेऊन येण्याचें आव्हान दिलें आहे.

राहिलेलीं गाणीं काय आहेत याचा नक्की अंदाज लागण्यापूर्वी त्या ग्रामोफोनचा अवतार बहुतेक आटपलेला असेल, अशी आशा आहे.

× × ×

अशा या ग्रामोफोनचें आणि असल्या या तबकड्यांचें (रेकॉर्डस्) चहाचिवड्यासाठीं पदरचा पैसा खर्च करून लोकांना प्रदर्शन दाखविण्यानें आमच्या शेजाऱ्याच्या पदरांत काय पडतें ? टिंगल. भरपूर टिंगल ! मला हें कळलें. कारण त्याचे कांहीं स्नेही माझेही स्नेही आहेत. बडेजाव वाढविण्यासाठीं बिचाऱ्यानें ग्रामोफोन घेतला. पण तोच लोकांनां त्याची कुचेष्टा करण्याचा एक विषय होऊन बसला आहे. पण त्याच्या मात्र हें गांवींही नाहीं !

रोज सकाळीं, संध्याकाळीं, रात्रीं, नवींनवीं माणसें त्याच्याकडे येत आहेत, रात्रीं बाराबारा वाजेपर्यंत तो तबकड्या वाजवतो आहे. मी इकडे कानांत कापसाचे बोळे घालून काय चारदोन ओळी वाचून झाल्या तर पहातों आहें. असा कार्यक्रम गेले सहा महिने चालू आहे.

त्याचा निरोप घेऊन परत जातांना लोक, ' हा आमचा शेजारी नाहीं.' म्हणून मनांतल्या मनांत स्वतःला धन्य समजत असतील ! मी मात्र त्यांचा हेवा करतों.

---

## २७ : : छापील संसार !

नुकतेंच लग्न झालें होतें त्यांचें.

लग्नापुरतें सुशिक्षित म्हणून टेंभा मिरवण्याइतकें, म्हणजे चांगलें पांच सहा यत्तांपर्यंत इंग्रजी शिक्षण झालें होतें तिचें. स्वयंपाक वगैरे गृहकृत्यांची फारशी माहिती अर्थात् तिला नव्हती.

पण ती सुशिक्षित होती. पुस्तकी माहितीच्या जोरावर तिनें आपला ' छापील संसार ' आपल्या मतें मोठ्या नमुनेदार पद्धतीनें चालविला होता.

नेहमीं नेहमीं ती फळभाजी नाहीं तर बटाट्याची भाजी करायची. आणि विशेष हें कीं, त्या भाज्यांत सालें तशींच ठेवलेलीं आढळत.

भाजींत सालें तशींच ठेवलेलीं पाहून त्याला मनांतल्या मनांत खूब संताप येत असे. पण लौकर जेवण करून घालण्याची घाई असल्यामुळें होत असेल असें, अशी समजूत करून घेऊन तो स्वस्थ बसे.

पण रविवारींही असा प्रकार दोन तीन वेळां आढळून आला. तेव्हां एका रविवारीं त्यानें जरा रागावूनच विचारलें,—

" हीं सालें काढून टाकायला काय होतें तुम्हाला ? माणसाला एवढं समजूं नये म्हणजे काय ! "

" म्हणजे, आपल्याला माहीत नाहीं वाटतं ? मुद्दामच ठेवतें मी तीं. दाखवितें हं मी आपल्याला—"

लगबगीनें ती बाहेरच्या खोलींत गेली, आणि 'गृहिणी' मासिकाचा एक जुना अंक घेऊन परत आंत आली. गडबडीनें तिनें त्याचीं पानें चाळलीं, आणि एका पानाशीं थबकून त्यांतल्या एका परिच्छेदावर बोट ठेवून, तिनें तो त्याला वाचायला सांगितला. त्यानें त्या मजकुरावरून डोळे फिरविले,—

" फळभाज्यांचीं सालें काढूं नयेत. बटाट्याची भाजीसुद्धां सालें काढून करूं नये. तसेंच फळांचीं सालेंही काढून टाकणें इष्ट नाहीं. सालींमध्यें शरीरास अत्यंत पोषक अशीं जीवनसत्वें असतात.... "

त्यानें डावा हात कपाळाला लावला, आणि मुकाट्यानें जेवण पुढें चालू केलें.

× × × ×

पण संध्याकाळीं तो हंसतच खोलींत शिरला. ती टेबलाजवळच्या एका खुर्चीवर कांहीं तरी विणीत बसली होती. तोही टेबलाजवळ आरामखुर्ची ओढून बसला. हातांतल्या रुमालांत बांधून आणलेलीं केळीं काढून त्यांतलें एकेक खाण्यास त्यानें सुरुवात केली. केळ्याच्या साली तो टेबलावर तिच्या पुढ्यांत टाकीत होता.

" केळीं आपण खायचीं, अन् साली माझ्या पुढ्यांत कशाला टाकायच्या त्या ? " ती चिडून म्हणाली.

" काय साली ! छे, छे ! केळ्यांतला निःसत्व गर स्वतः खाऊन, जीवनसत्वांचा हा गड्डा मी तुझ्याकरतां राखून ठेवला आहे ! "

---

# २८ : : माणूस आणि देवदूत

“तुला स्वर्ग हवा का ? ” तो देवदूत म्हणाला.

“ काय आहे तिथें ? ” मी त्याला विचारलें. हिंदी संस्थानिकांसारख्या आळशी आणि चैनी देवांचं राज्य तिथें असावं, अशी पुराणांतलीं वर्णनें वाचून माझी ठाम कल्पना झाली होती.

“ तिथे अमृत आहे. ” उजव्या हाताच्या उंचंच्या पंजाची करंगळी मोडून, तिच्यावर आंगठा ठेवून तो मोजदाद करूं लागला.

“ माहीत आहे मला ! आणखी काय आहे ? ” मी म्हणालों.

“ अमृत पिणाराला कधींही मरण येत नाहीं, माहीत आहे तुला ? ” देवदूत अमृताची थोरवी मला पटवून देण्यासाठीं डोळे ताणून म्हणाला.

“ हो ! आणि मरणाची भीति नाहींशी झाल्यामुळें, अमृत पिणारांना आयुष्याची किंमत कळेनाशी होते, कर्तव्य म्हणून कांहीं असतें याची त्यांना जाणीवच नाहींशी होते, हेंही माहीत आहे मला ! बरं, आणखी काय आहे तिथें ! ”

" तिथें कल्पवृक्ष आहे. मागितल्यावर त्याच्याकडून मिळत नाहीं, अशी वस्तु त्रिभुवनांत नाहीं. माहीत आहे तुला ? "

" हो ! शेंकडों वेळां वाचलंय मी तें. आणि पोट धरधरून हंसलों आहें. "

" औं ? " ' काय चमत्कारिक माणूस आहे, ' अशा आविर्भावानें देवदूत माझ्याकडे आ वासून पहातच राहिला.

" हं. अगदीं खरं आहे. शेंकडों वेळां पोट धरधरून हंसलों आहें मी. प्रत्येक गरज कल्पवृक्षाकडून भागवली गेल्यामुळें स्वर्गातले देव कसे निष्क्रिय झाले असतील, आणि कधीं कधीं ' नको हा कल्पवृक्ष ' असें म्हणण्याची पाळी त्यांच्यावर कशी येत असेल, याची कल्पना केल्यावर हंसूं आल्याशिवाय रहातच नाहीं. बरं आणखी कांहीं आहे का तिथें ? "

देवदूत आतां थोडा खजील झाला होता. हतबुद्ध होऊन तो मला म्हणाला, " तिथें काय आहे, हें मला विचारण्यापेक्षां, तुला काय हवें आहे तेंच एकदां सांगून टाक अगदीं थोडक्यांत सांगायचं तुला म्हणजे तिथें नाहीं असें या त्रिभुवनांत कांहींच नाहीं. "

" खरं ? ? "

" यांत काय संशय ? अगदीं खरें ! "

" छट् ! खोटें सांगतोस तूं ! "

" आतां काय सांगावं तुला ! अरे बाबा, तिथे अगदीं सगळं सगळं आहे. " देवदूत जरा त्रासून म्हणाला.

" बरं, मग अश्रूसुद्धां असतील तिथें ! नाहीं ? " मी म्हणालों.

देवदूताला वाटलं, हा माणूस अश्रूंना भीत असावा. तो एकदम हंसून म्हणाला,—

" छे रे बाबा, तेवढं मात्र नाहीं तिथें. अगदीं नांवसुद्धां नाहीं त्यांचं तिथं. "

" काय ? स्वर्गांत अश्रू नाहींत ? स्वर्गांत अश्रूच नाहींत ? मग तो मला मुळींच नको ! चालता हो तूं इथून ! " मी बेबीच्या देंठापासून ओरडलों !

देवदूत अगदीं हिरमुसला झाला. आश्चर्य आणि निराशाजन्य खेद यामुळें अगदीं केविलवाणा झालेला त्याचा चेहरा पाहिल्यावर मला हंसूं आवरेना.

× × × ×

'कुणी तरी' मला हलवून जागें केलें. कारण मी मोठमोठ्यानें हंसत होतों.

" हंसण्यासारखं काय स्वप्न पडलं एवढं ? " 'कुणी तरी' म्हणालं.

तें स्वप्नच होतं अशी खात्री झाल्यावर मला फार बरं वाटलं. नाहींतर मला धास्ती पडली होती कीं, तो देवदूत मला खरोखरच स्वर्गांत घेऊन जातो कीं काय ? मी त्या स्वप्नांतलं दृश्य डोळ्यांपुढं आणून अगदीं गुंग झालों होतों.

" मला नाहीं का सांगायचं ! कसलं एवढं गोड स्वप्न पडलं ? "

" गोड ? छेः, फार भयंकर स्वप्न ! " आणि मग मी तें सगळं स्वप्न,— त्यांतलं सगळं संभाषण, 'कुणाला तरी' सांगितलं.

" तूं जाशील असल्या स्वर्गांत ? " शेवटीं मी विचारलें.

" अंऽहं, मी नाहीं जाणार कध्धींसुद्धां ! " तें 'कुणी तरी' म्हणालं.

" कां ? "

" कां तें नाहीं मला नीट सांगतां येणार ! पण मी जाणार नाहीं एवढं मात्र खरं ! पण तुम्ही सांगा ना ? "

"छेः ! तें सांगायचं नसतंच मुळीं. ज्याचं त्यानं समजायचं असतं. ज्याला तें समजावून सांगावं लागतं, त्याला तें कधींच समजत नाहीं. अश्रू कशामुळें येतात ? आंतड्याच्या मायेमुळें, अंतःकरणाच्या जिव्हाळ्यामुळें. स्वर्गांत अश्रू नाहींत, अर्थात् तेथें जिव्हाळा, माया, प्रीती वगैरे मृदु भावनाही नसल्या पाहिजेत. असला स्वर्ग मला तरी पृथ्वीहून अधिक मोलाचा वाटत नाहीं. "

" खरंच. पटलं मला ! "

---

## २९ : : सद्धर्मसंस्थापक !

विक्रमपुरांतील न्हाव्यांनीं एकदां सत्याग्रह केला. सत्याग्रहाचें नेतृत्व शिदबा न्हाव्याकडे होतें.

कोणाही पुरुषानें हातानें दाढी करतां कामा नये, रात्रीं—बेरात्रीं गिऱ्हाइकाची हजामत करण्याचा प्रसंग येत असल्यामुळें न्हाव्यांना कापूसभावाच्या आंकड्यांच्या घडामोडी, नवीन सुरू झालेले बोलपट, वगैरे महत्वाच्या बाबींकडे लक्ष देण्यास पुरेशी फुरसत मिळत नाहीं, तरी या प्रकाराला आळा बसावा, वगैरे वगैरे अनेक मागण्या सत्याग्रही न्हाव्यांनीं केल्या होत्या.

सहा महिने झाले. तरी न्हाव्यांचा संप हटण्याचीं चिन्हें दिसेनात. सगळे सभ्य गृहस्थ हवालदील झाले. कॉलेजमधल्या एका तरुणानें तर वाढलेल्या जटांचा गळ्याला फांस लावून घेऊन आत्महत्या केली !

आरंभीं आरंभीं सर्वजण हातानें दाढी करीत असत. पण पुढें डोक्यावरचा पसारा प्रमाणाबाहेर वाढला; तेव्हां तो थोडा प्रमाणबद्ध दिसावा म्हणून लोक दाढीमिशांचीही दाद घेईनासे झाले. एकंदरींत लोकांना वैदिक काळांतली दशा प्राप्त झाली !

सनातन्यांचा आनंद मात्र पोटांत मावेना ! वैदिक धर्माला पुनः प्रतिष्ठा प्राप्त झाली म्हणून, पाठींत पोंक आलेल्या वृद्ध सनातन्यांनासुद्धां आकाश

ठेंगणें वाटूं लागलें. त्यांनीं सभा भरवून आपल्या आनंदाचें प्रदर्शन करण्याचा सपाटा सुरू केला.

अशीच एक सनातन्यांची सभा भरली होती. अनेक धर्ममार्तंडांचीं तींत भाषणें झालीं. मिशांचें दैनंदिन मुंडण बंद झालें, घेऱ्याचें प्रस्थ पूर्ववत् वाढलें, शेंडीला पुनः पूर्वीचे दिवस प्राप्त झाले, तेणेंकरून वैदिक धर्माची संस्थापना झाल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत, म्हणून अनेक सभासदांनीं बेंबीच्या देंठापासून ओरडून आनंद प्रदर्शित केला.

आणि आतां सभा बरखास्त होणार तोंच ओंठावर नुकतीच मिसरूड फुटलेला एक तरुण व्यासपीठावर उभा राहिला,—

" मद्धर्मबांधव हो ! आपल्याला माहीत आहे, धर्माला ग्लानि आली म्हणजे त्याची संस्थापना करण्याकरतां भगवंत अवतार घेत असतात. न्हाव्यांच्या सत्याग्रहामुळें आपल्या मस्तकावरचा भार वाढला असेल; पण पृथ्वीवरील पापाचा,—अधर्माचा, भार कमी झाला आहे. या धर्मसंस्थापनेचें श्रेय न्हाव्यांचा—आणि आपला सनातन्यांचाही—त्राता, शिदबा न्हावी यालाच दिलें पाहिजे. शिदबा म्हणजे 'अवतार' आहे. त्याची मोठ्या थाटानें मिरवणूक काढणें आपलें कर्तव्य नव्हे काय ? बोला, सद्धर्मसंस्थापक शिदबा न्हावी की जय ! "

सगळे सनातनी तार स्वरानें ओरडले,—

" सद्धर्मसंस्थापक शिदबा न्हावी की जय ! "

आणि तो तरुण, शिदबा न्हाव्याचा आदल्याच दिवशीं मुंबईहून आलेला पोरगा होता, हें शेवटपर्यंत कोणालाच समजलें नाहीं !

---

## ३० : : यू चेची चूक!

सहा वाजून गेले होते. पण सूर्य अजून उगवला नव्हता. थंडी फार कडक पडली असल्यामुळें कदाचित् तो अजूनही बिछान्यांत लोळत पडला असावा!

पण बिचारा यू चे मात्र आपलें कापडाचें गाठोडें बगलेंत मारून, नेहमींची गाडी गांठण्यासाठीं ठराविक वेळीं स्टेशनवर हजर होता. बगलेंतलें गांठोडें हातांतल्या वेताच्या सोट्यासह बांकावर ठेवून, आणि आपले गारठलेले उघडे पंजे बंद कॉलरच्या घंगाळपोतेंवजा आंखूड कोटाच्या खिशांत घालून, तो गाडी येण्याची वाट पहात प्लॅटफॉर्मवर उभा राहिला होता. थंडीमुळें फुटून रांठ झालेले त्याचे पातळसर ओंठ कांपत होते, आणि ते शक्य तों दाबून ठेवण्याचा निष्फळ खटाटोप तो करीत होता. त्याच्या जवळच्या गांठोड्यांत विक्रीसाठीं भरपूर कापड होतें; पण त्याच्या स्वतःच्या अंगावर मात्र, अगदीं मोजके, साधे, पण दणकट कपडे होते. गार झोंबरें वारें सुटल्यामुळें मधून मधून त्याच्या अंगावर शहारे येत, तेव्हां तो आपले दाबलेले ओंठ विलग करून दांतांच्या फटींतून ' स् स् स् ' करीत आंत श्वास घेत असे.

गाडी आली. आपलें गांठोडें बगलेंत मारून यू चे गाडींत शिरला. एका मोकळ्या बांकाच्या कोंपऱ्यांत बसून त्यानें आपलें गांठोडें बाजूला ठेविलें. समा-

धानाचा एक सुस्कारा सोडून, थंडीनें जास्तच खडबडीत झालेल्या आपल्या गालांच्या उंच हाडांवरून त्यानें एकदां हात फिरविला. नंतर आपल्या चपट्या नाकपुड्यांवर थंडीचा कितपत परिणाम झाला आहे, हें हस्तस्पर्शानें अजमावण्याचा यत्न करीत असतांना, त्याची नजर सहज पलीकडच्या बांकाकडे वळली. त्याचे अफूनें तारवटलेले, लुकलुकत बारके डोळे एकाएकीं अधिक बारीक झाले. अधिक लुकलुकूं लागले.

हरवलेली वस्तु सांपडतांच तिच्या मालकाला जसा आनंद व्हावा तसा आनंद त्याच्या चेहऱ्यावर खेळूं लागला. पलीकडच्या बांकावर, बांकाच्या पाठीकडे आपला पुढा वळवून, एक चार पांच वर्षांची छोकरी उभी राहिली होती. एखाद्या मंत्रमुग्धासारखी यू चेची नजर तिच्यावर खिळून राहिली होती. त्याचे डोळ अधिकच बारीक होत होते, आणि त्यांत वात्सल्याच्या कोमल छटा स्पष्ट प्रतिबिंबित होत होत्या. जणूं मधानें ओथंबलेल्या फुलांच्या कर्णिकाच !

एकाएकीं त्या छोकरीची नजर यू चेकडे वळली.

" ओ हो ऽ ऽ ! " ती अगदीं खदखदून हंसली. जणूं यू चेची आणि तिची फार दिवसांची ओळख होती.

यू चेच्या अंतःकरणांतील वात्सल्याची भावना उचंबळून आली. त्याची रुंद जिवणी अधिकच रुंद झाली. तिला आपली भीति वाटूं नये म्हणूनच कीं काय, तो फार मोठ्यानें हंसला नाहीं. त्याच्या ओबडधोबड आणि निर्विकार चेहऱ्यावर तसलें मनमोकळें, मृदु, स्निग्ध हास्य चमकेल, अशी कोणाला कधीं कल्पनाही आली नसती!

यू चेच्या अंतःकरणाची भाषा त्या ' अजाण ' समजल्या जाणाऱ्या छोकरीला तत्काळ कळली. आपले चिमुकले नाजुक ओंठ विलग करून, तिनें पुन्हा आपली शुभ्र दंतपंक्ति व्यक्त केली. रक्तवर्ण अरुणाच्या मागून कोंवळे सूर्यकिरण चमकल्याचा यू चेला भास झाला.

त्यानें हातानें तिला आपल्याजवळ येण्यास खुणावलें.

खिडकींतून बाहेरची शोभा पहाण्यांत गुंग झालेल्या आपल्या आईकडे हळूच एक दृष्टिक्षेप करून, ती यू चेजवळ आली; पण यू चेकडे एकदांही न पहातां त्याच्या गांठोड्यावर तिनें हल्ला केला. परवानगीचे शिष्टाचार फक्त मोठ्या माणसांनीं पाळायचे असतात !

' काय बरं असेल त्यांत ! खेळणी ! खाऊ ! कीं आणखी कांहीं ! ' हेच विचार तिच्या मनांत घोळत असावेत !

यू चे तिला खुणांनीं दटावण्याचा भाव आणीत होता. पण ती कांहीं ऐकेना.

यू चे कौतुकानें हंसला, आणि त्यानें तें गांठोडें तिला उघडून दाखविलें. आंत सगळें कापडच भरलेलें पाहून तिची अगदीं निराशा झालेली दिसली. यू चे पुन्हा हंसला. पण लगेच परकराचें एक टोंक आपल्या बोटाभोंवतीं गुंडाळीत ती म्हणाली, ' माझ्या भावलीला आतां एक पलकल शिवायचाय्. ' ती काय म्हणते आहे हें यूचेच्या डोक्यांत उतरणें अशक्य होतें. कपाळावरची हॅट जरा मागें सारून उगाचच त्यानें एकदां आपल्या डोक्यावरील टकलावरून हात फिरवला. ' ए पार्लीवाला, दिडकीला पांचवाला ' असें ओरडणाऱ्या एका पेपर-मिंटविक्याला जवळ बोलावून त्यानें दोन पैशांचें पेपरमिंट खरेदी केलें. तें तिच्या हातांत देऊन आणि प्रेमभरानें तिची पाठ थोपटून तो पुन्हा मनापासून हंसला.

वड्या हातांत पडतांच ती छोकरी तेथून निसटली, आणि तडक आपल्या आईकडे गेली. " आई ! " तिला गदगदां हालवून पुडी सोडीत ती म्हणाली, " हें बघ मला काय तें ! तुला कुठाय् ! "

तिची आई तिच्या हातांतल्या वड्यांकडे पाहून किंचित् कठोर स्वरांत म्हणाली, " कुणी दिलन् ?" छोकरीनें यू चेकडे बोट दाखविलें, आणि शोधक नजरेनें आईच्या तोंडाकडे पाहिलें. तिच्या आईनें कपाळाला आंठ्या घालून आणि नाकाला मुरड घालून म्हटलें, " शीः, टाकून दे त्या ! घाणेरडी कुठली ! "

आई असं कां म्हणते हें त्या चिमुकल्या जिवाला न कळणें निसर्गाला सोडून नव्हतें. त्या वड्या फेंकून देण्याचा तिला धीर होईना. ' इतक्या वड्या,—अन् हट्टा-शिवाय मिळालेल्या,—फेंकून द्यायच्या ? कां ? ' ती अगदीं गोंधळून गेली. तिनें पुन्हा एकदां प्रश्नार्थक मुद्रेनें आईकडे पाहिलें.

डोळे वटारून तिची आई म्हणाली, " टाक त्या ! टाकते कीं नाहीं आधीं ? " तिला अजून चुळबुळतांना पाहून ती पुढें म्हणाली, "त्याला म्हणावं तूंच खा त्या ! " या चिथावणीचा चांगला उपयोग झाला. हातांतल्या वड्या यू चेकडे भिरकावीत ती छोकरी म्हणाली, " तूंच का मनावं त्या ! "

हा वेळपर्यंत यू चे अगदीं स्तब्ध राहून सर्व प्रकाराचें अवलोकन करीत होता. त्या छोकरीचें आणि तिच्या आईचें बोलणें त्याला कळत नव्हतें. पण त्यांच्या हावभावांवरून त्याला एकंदर प्रकार कळत होता. त्याच्या मुद्रेवरचीं आनंदाचीं चिन्हें केव्हांच नष्ट झालीं होतीं. नाकांतून उष्ण श्वास बाहेर येत होता. ओंठ कांपत होते. डोळे पाण्यानें भरून आले होते. त्यानें मान खालीं घातली. पायाशीं पडलेल्या वज्यांकडे पहातांच तो अगदीं हिरमुसला झाला. त्याच्या मनाला विलक्षण वेदना होत होत्या. त्याला आपला अपराध समजेना.

त्या दिवशीं यू चे नेहमींपेक्षां बराच लौकर आपल्या निवासस्थानाकडे परत आला. त्यानें कांहीं खाल्लें नाहीं, फार काय, पण त्याचा आवडता कोरा चहाही त्या दिवशीं त्यानें घेतला नाहीं. आपल्या अफू--सेवनालाही त्यानें फांटा दिला.

घरीं आल्याबरोबर बगलेंतलें गांठोडें एका कोंपऱ्यांत फेंकून देऊन आपल्या मोडक्या पलंगावरच्या फाटक्या तरटावर त्यानें अंग टाकून दिलें.

संध्याकाळचे सात वाजून गेले, तरी यू चे तसाच पडला होता. साडेसात वाजतां, यू चेचा मुलगा फा घरीं आला. आपला बाप आठाच्या आंत घरीं आलेला त्यानें क्वचितच पाहिला होता.

सुमारें एक वर्षापूर्वी यू चे आपल्या मुलासह पोट भरण्यासाठीं हिंदुस्थानांत आला. तेव्हांपासून आठाच्या आंत तो घरीं परत आल्याची ही फार तर तिसरी चौथी वेळ असेल. पण आजच्यासारखा तो पडून कधींच राहिला नव्हता.

फा रस्त्यावर जादूचे खेळ करून दाखवून रोज पोटापुरती मिळकत कमावीत असे. आज त्यानें रोजच्या दुप्पट कमाई केली होती. मोठ्या उत्सुकतेनें ही बातमी बापाला सांगण्यासाठीं तो जवळ जवळ धांवतच बापाच्या खोलींत शिरला. पण आंतील दृश्य पहातांच एक क्षणभर तो अगदीं हतबुद्ध झाला. तो पलंगाच्या जवळ आला. पलंगावरच्या उशींत डोकें खुपसून यू चे मुकाट्यानें अश्रू ढाळीत होता.

त्याच्या अश्रूंनीं भिजलेल्या उशीकडे पाहून फाच्या डोळ्यांचे कोपरे ओले झाले. कांपऱ्या आवाजांत तो म्हणाला, " बाबा, तुम्ही रडतां कां ? "

यू चे उठून बसला. त्यानें आपल्या मुलाला अगदीं जवळ ओढून घेतलें. त्याच्या डोळ्यांतलीं उष्ण आंसवें फाच्या मस्तकावर पडत होतीं. फाच्या पाठी-वरून प्रेमळपणानें हात फिरवीत अत्यंत मृदु स्वरांत तो म्हणाला, " बाळ फा, तुला तें एवढ्यांत कळणार नाहीं, आणि कधींही न कळलेलंच बरं. मी देवाची तशी प्रार्थना करीन. फा, जगाचा तुला अगदींच अनुभव नाहीं रे ! "

पुन्हा त्याचे डोळे भरून आले. त्यानें फाला छातीशीं घट्ट धरलें. त्याचे अश्रू फाच्या मस्तकावर पडत होते. फाचे डोळे देखील पाण्यानें भरून आले. आणि यू चेचें वक्षस्थळ त्यांनीं भिजवून टाकलें.

यू चे आतां कांहींसा शांत झाला. तो बोलूं लागला, " फा, तुला कधीं आपल्या आईची आठवण होते ? " फाचें हृदय भरून आल्यामुळें त्यानें नुसती मान डोलविली. " आणि फा, आपली छोटी चैनषा तुला कधीं आठवते ? "

फानें पुन्हा नुसती मान हालविली. आपल्या लाडक्या लहानग्या बहिणीच्या आठवणीनें त्याचें अंतःकरण व्याकुळ झालें होतें.

यू चे पुढें बोलूं लागला,—

" बरं का फा, आज सकाळीं गांवांत मला एक आपल्या चैनषाएवढीच लहान छोकरी आढळली. आपल्या चैनषासारखीच दिसण्यांत मोठी गोड होती ती. गोड म्हणजे कांही सुरेख नव्हे. आपली चैनषा कांहीं तशी सुरेख नाहीं. अन् ती पण तशी मोठी सुरेख नव्हती. पण चैनषासारखीच तीही नेहमीं हंसतमुख असते. आणि गंमत अशी कीं, थेट चैनषासारखीच हंसते ती. तिला पाहिल्या-बरोबर मला आपल्या चैनषाची आठवण झाली. आणि त्या छोकरीनें माझें मन इतकें आढून घेतलें कीं, मला स्वतःचें भान राहिलें नाहीं. आपल्या चैनषा-प्रमाणेंच मी तिच्याशीं हंसू खेळूं लागलों. पण फा,—"

यू चे अधिक गंभीर झाला. त्याचा आवाज अधिक कांपरा येऊं लागला. " माझ्या हातून तो मोठाच अपराध झाला. मला त्याची आधीं जाणीव नव्हती. वात्सल्यानें वेडा होऊन भावनेच्या भरांत त्या छोकरीबद्दल नकळत मी जो आपलेपणा दाखविला, तो माझा मूर्खपणा ठरला. त्याबद्दल मी तिरस्काराला पात्र झालों. या देशांत मी एक तिरस्करणीय प्राणी समजला जातों....

...माझा स्पर्श, फार काय माझी क्षणभराची संगत म्हणजे भयंकर आपत्ति समजली जाते, हें मला आज पूर्णपणें कळून चुकलं. त्या छोकरीला मी माझी चैनषाच मानली हीच काय ती माझी चूक ! पण तो महान् अपराध ठरला ! ”

दमूनभागून गेलेला फा, यू चेचें बोलणें चालू असतांना केव्हां झोंपी गेला हें खुद्द फाला आणि यू चेलाही कळलेंच नाहीं !

अंथरुणांत पडल्यापडल्या, चैनषाच्या भेटीसाठीं शक्य तितक्या लौकर मायदेशीं जाण्याचा बेत करीत असतांच यू चेंचे शिणलेले डोळे मिटले.

× × × ×

दुसऱ्या दिवशीं यू चे नेहमींप्रमाणें कापडाचा गठ्ठा कांखोटीस मारून विक्रीसाठीं बाहेर पडला. आज दैव त्याला अनुकूल होतें. दहा वाजेपर्यंत त्यानें बरेंचसें कापड विकलें.

नंतर एका भव्य बंगल्याकडे तो विक्रीच्या आशेनें वळला. तो फाटकाच्या आंत शिरला. त्यानें समोर नजर टाकली. आश्चर्यानें तो थक्कच झाला !

तीच ती कालची छोकरी !

तिनें आपल्याकडे तिटकाऱ्यानें पहाण्यापूर्वींच आपण चालतें व्हावें म्हणून तो माघारी वळला.

तोंच आपला आवाज शक्य तितका उंच चढवून ती ओरडली,—

“ अलेऽऽ, एऽऽ, इकले ये, इकले ये. ”

ती हांक यू चेच्या अंतःकरणाला जाऊन भिडली. त्यानें मागें वळून पाहिलें. त्याचें पाऊल पुढें पडेना. धन्यानें हांक मारलेल्या कुत्र्यासारखा, तो स्वतःच्या नकळत मागें वळला.

तो आपल्याकडे येत असलेला पहातांच ती एकदम धांवत येऊन त्याला बिलगली. आणि तिला उचलून घेण्यासाठीं तो खालीं वांकला, तेव्हां त्याच्या गालाचा एक ‘ पापा ’ घेऊन, आपल्या आईची नक्कल करीत ती म्हणाली, “ किती गोल आहे ले ! ”

यू चे मनांत म्हणाला,—“ हिला माझी चैनषाच मानण्यांत मी चूक केली, असं मला काल वाटलं. पण तसं वाटलं हीच माझी चूक ! सगळीं लहान मुलं सारखींच निर्मळ मनाचीं असतात; आणि आम्ही मोठीं माणसंच आमच्या शिकवणुकीनें त्यांना बिघडवतों ! ”

---